

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष २० : अंक ३ पावसाळा २००२

अपूर्वः कोऽपि कोशोऽयं विद्यते तव भारति ।
व्ययतो वृद्धिमायाति क्षयमायाति सञ्चयात् ॥

अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर,
गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन वर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले,
अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट,
४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९ pravinshah@ip.eth.net

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ,
सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा,

**प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी

**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

# मराठीची व्यवहार्य मागणी

दूरध्वनीवर कामकाजाचं बोलताना, आरक्षण करताना परक्या व्यक्तीला नाव-गाव लागतं, तेव्हा नावातली अक्षरं नीट कळावीत म्हणून 'बी फॉर बिहार', 'एच फॉर हैदराबाद' असं सांगितलं जातं – 'अ' अननसातला'च्या धर्तीवर. अचूक संज्ञापनेची ही गरज जाणवून फार पूर्वीपासून भारतीय रेल्वेतील कर्मचारीवर्ग अशा नामांकनानं संज्ञापन करत आला आहे. देशभर पसरलेल्या रेल्वेरूळांवरून मालानं भरलेल्या वाघिणींची ये-जा होत असते. कुठून कुठे, किती वाघिणी रवाना झाल्या आहेत, त्याचा संदेश असा असतो : 'पाच काशीराम, दोन चिंतामण.' हे कोण काशीराम आणि चिंतामण एवढ्या संख्येनं सारखी ये-जा करतात, ते रेल्वेतील संबंधितांना नेमकं माहीत असतं. बंदिस्त वाघिणी म्हणजे कव्हर्ड वॅगन 'सी' वॅगन; तर उघड्या वाघिणींना 'के' वॅगन असं नाव आहे. किती 'सी' आणि किती 'के' हे सांगण्यात-ऐकण्यात, समजण्यात घोटाळा नको म्हणून 'सी' होतो - चिंतामण आणि 'के' होतो – काशीराम. असे आणखीही गृहस्थ आहेत. म्हणजे रेल्वेचं दळणवळण, त्यातली दूरध्वनीची संदेशयंत्रणा आणि या संदेशांना नेमकेपणा, अचूकपणा देणारी भाषिक क्लृप्ती. भाषावैविध्य, उच्चारांमधील तफावत, वैयक्तिक लकबी, भिन्न प्रांतीयता या सगळ्या अडसरांवर मात करून टिकून राहिलेली व मुळात कल्पकतेनं शोधून काढलेली पद्धत. एका विशिष्ट क्षेत्रापुरता मर्यादित भाषाविशेष. असे प्रत्येक क्षेत्राचे काही भाषाविशेष असतात. उदाहरणार्थ, कारखान्यात किंवा फाउंड्रीत 'घोडा', 'टाटाचं पातेलं' यांचा अर्थ विशिष्ट यंत्राचे सुटे भाग. हे झालं क्षेत्रसीमित भाषेचं छोटंसं उदाहरण.

दुसरीकडे, या व्याप्तीचं दुसरं टोक. संगणक-इंटरनेटवरून आपल्यावर होणारा भाषिक वर्षाव. शिक्षण, संस्कार, वय, लिंग, व्यवसाय, प्रदेश या सर्वांना उल्लंघून क्षणभरात जगभर देवाणघेवाण होते, ती नाना प्रकारच्या माहितीबरोबरच किस्से, विनोद, भावगर्भ गद्य-पद्य उतारे, उखाणे-प्रश्न इत्यादी गोष्टींची. या संज्ञापनेत सर्वच मर्यादा गळून पडतात.

मराठीचा प्रवाह आज हे दोन्ही बांध कवेत घेऊन वाहत आहे.

नवीन नवीन कार्यक्षेत्रं, व्यवसाय, शिक्षणक्रम यांची मराठी जीवनात भर पडत आहे. रेकीपासून टीव्ही सिरियल-लेखनापर्यंत विविध उपजीविका-मार्गांचा विस्तार वाढतो आहे. या सर्व व्यवहारांना पुष्टी देण्यासाठी मराठीचे उपयोजन होते; पण नुसते प्रसारमाध्यमांकडे पाहिलं तरी नियतकालिकं, टीव्ही यांमधल्या मराठीच्या वापरात भाषेची गुणवत्ता फारशी समाधानकारक नाही. चुकीचे वाक्प्रचार, चुकीची वाक्यरचना, ऱ्हस्व-दीर्घ अविवेक, भाषिक अनास्थेपोटी भाषेकडे झालेले दुर्लक्ष असे प्रकार आपल्याला सर्रास आढळतात. त्याबद्दल पोटतिडिकेने तसेच लिहिले-बोलले जाते. तेही कानाआड टाकून भाषा-व्यवहाराचा झपाटा तसाच चालू राहतो.

हा वाढीचा काळ हीच मराठीच्या विकासाची संधी आहे.

मराठीवर इतर भाषांची कुरघोडी होत आहे, ही तक्रार आपण नित्य ऐकतो; पण परप्रांतीयांना - परदेशी नागरिकांना मराठी भाषा रीतसर शिकायची झाली तर मराठी शिकण्याची सोय कितपत आहे? आहे ती पुरेशी आहे का? जिथे आहे तिथे, मराठी भाषा शिकवणारे भाषा-अध्यापनतंत्रज्ञ निपुण आहेत का? त्यांना भाषा अध्यापन-कौशल्ये विकसित करायची असतील, तर तसे प्रशिक्षण देणारा अभ्यासक्रम आपल्याकडे आहे का?

आज सहजगत्या जनसामान्यांपर्यंत पोहोचणारी संपर्क-माध्यमं म्हणजे वृत्तपत्रं, नियतकालिकं, टी.व्ही. व तत्सम दृक्-श्राव्य माध्यमं. या माध्यमांच्या वाढत्या व्यापात व्यावसायिक संधीही खूप आहेत. त्या झेलणारा तरुणवर्गही मोठ्या प्रमाणावर आहे. या व्यवसायाची एक वेगळी भाषिक गरज आहे. ताबडतोबीनं आणि थेटपणानं प्रेक्षक-वाचकांशी संवाद साधणं, दररोजच्या घडामोडींनुसार नव्या नव्या विषयांना भिडण्यासाठी भाषासज्ज राहणं, लेखन, अनुवाद, संवाद, मुलाखत, शब्दांकन ही भाषिक कौशल्यं वापरता येणं, ह्या या माध्यमांच्या भाषिक गरजा आहेत. या व्यवसायात येणाऱ्या व्यक्ती आपापल्या वकुबानुसार त्या गरजांना तोंड देतात. नवशिका माणूस पाण्यात पडल्यावर त्याचा जीव गुदमरतो तसा या उमेदवारांचाही जीव घुसमटतो. (वृत्तपत्राचा आकार लहान झाल्यावर तर भाषेचा परिणामकारक वापर करायची गरज अधिकच वाढली आहे.) मग जमेल त्या पद्धतीने ते भाषेचं आयुध वापरतात. त्यांच्या वारांनी सुजाण वाचक हैराण होतो व मराठीच्या दैन्यावस्थेबद्दल हळहळतो; पण मुळात मराठीची आणि संपर्क-माध्यमांची व्याप्ती वाढायला लागल्याबरोबर ही भाषिक गरज, भाषा-

व्यवस्थापनाची गरज आपल्या शिक्षणसंस्थांच्या लक्षात आली नाही. संगणक आल्यावर गल्लोगल्ली संगणक अभ्यासक्रम आणि पाठोपाठ नेटकॅफे आले. पंचवीस-तीस वर्षांपूर्वी आखाती देशांत नोकरीच्या संधी मिळाल्याबरोबर केरळमध्ये अरबी भाषेचे वर्ग सुरू झाले; पण खुद्द मराठीच्या बाबतीत, संपर्क-माध्यमांमुळे आलेल्या नवीन संधी ओळखण्यात आपण कमी पडलो. संपर्क-माध्यमांच्या भाषिक गरजा लक्षात घेऊन संज्ञापन-कौशल्ये विकसित करण्याच्या कार्यशाळा सुरू करणं व त्यात लवचिकता ठेवणं ही आपली गरज आहे.

भाषेला मुख्य अधिष्ठान असतं मौखिकतेचं. ती बोलली जाते, म्हणून तर 'बोली' किंवा 'भाषा'. प्रसंगानुरूप, विषयानुरूप उचित बोलणं म्हणजे काय, याचे श्राव्य संस्कार घेण्यासाठी सुसज्ज भाषा-प्रयोगशाळाही आपल्याला हव्या आहेत. सुदैवाने आज आपल्याकडे कसलेले अभिनेते, वाचा-जोपासनातज्ज्ञ, भाषा-वैज्ञानिक आहेत. यांचा मेळ साधून संस्था-संलग्न प्रयोगशाळा उभारणं व चालवणं कठीण नाही. जिथे जिथे आणि ज्या ज्या कामासाठी बोलावं लागतं, तिथे हे कौशल्य किती उपकारक ठरेल, हे सांगण्याची गरज नाही. इंग्रजी माध्यमातून शिक्षण घेतलेल्या मराठी वर्गाला तर याची फार गरज भासते आहे. शिवाय संगणकमय झालेल्या युगातही मौखिकतेलाच प्राधान्य येणार आहे. कारण कळफलक न दाबता, आपण बोलू ते संगणकात साठवले जाईल व उलट संगणकाला भरवलेली माहिती श्राव्य स्वरूपात कळू शकेल. या परिस्थितीत नेमके उच्चार, वाचासंस्कार महत्त्वाचे ठरणार आहेत. मराठीच्या उपयोजनाची व्याप्ती वाढत चाललेली असताना तिच्यावर होणारं इंग्रजीचं आक्रमण ही आपल्याला चिंतेची बाब वाटते. काही प्रमाणात ही चिंता खरीही आहे; पण इंग्रजीचं आक्रमण परतवण्याच्या चिंतेचा भार वाहण्यापेक्षा मराठीचा सक्षम वापर वाढवण्याकडे आपले प्रयत्न वळवणं हे अधिक फायदेशीर आहे.

विद्यापीठीय पातळीवरचे मराठी विभाग, मराठीच्या विकासाच्या उद्दिष्टाने स्थापन झालेल्या संस्था, भाषाविज्ञान विभाग यांच्या परस्पर-सहकार्याने यातील बहुतांश गोष्टी पार पडू शकतील. आपल्याकडे तज्ज्ञांची वानवा नाही. इच्छाशक्ती आणि योजकता यांच्या बळावर आपण हे कार्यक्रम हाती घेऊ शकू. विद्यार्थी घेत असलेले विद्यापीठीय शिक्षण ही एक प्रकारे समाजाने केलेली गुंतवणूकच असते. इतर देशांच्या मानाने आपल्या देशात शिक्षण स्वस्त आहे; कारण त्यात समाजाने गुंतवणूक केलेली आहे. त्यामुळे या गुंतवणुकीचा परतलाभ काही प्रमाणात तरी

समाजाला स्थायी स्वरूपात व्हायला हवा. तेव्हा शब्दकोश, भाषांचा क्षेत्र अभ्यास, निरीक्षण इत्यादी दीर्घ काळ चालणाऱ्या प्रकल्पांत पीएच.डी. विद्यार्थ्यांना सहभागी करून घेऊन 'वाहते प्रकल्प' (प्रदीर्घ काळ चालू राहणारे प्रकल्प) चालू ठेवता येतील.

एरवी आपल्या भावना, विचार व्यक्त करताना आपण भाषेचा आसरा घेतो. भाषेकडे आपण मागणं करतो अर्थानुकूल अभिव्यक्तीचं. आज आपल्या समाजात होणाऱ्या स्थित्यंतराची साक्षी होताना मराठी भाषा आपल्याकडे मागणं करतेय उचित प्रतिसादाचं.

**विजया देव**

मुखपृष्ठ
**मराठीत अर्थ** : भाषे, तुझं भांडार मोठं अपूर्वच म्हटलं पाहिजे. ते खर्च केलं असता वाढतं आणि बचत केली तर कमी होतं.



अनुक्रमणिका

# चाफा आणि भुंगा

**माधव ना. आचार्य**

शिवचरित्रपर बखरींमध्ये 'शिवछत्रपतींचे सत्पप्रकरणात्मक चरित्र' ही एक महत्त्वाची बखर मानली जाते. इ.स. १८११ च्या सुमारास हिचे लेखन झाले. हिचा लेखक मल्हार रामराव चिटणीस हा सुप्रसिद्ध खंडो बल्लाळचा पणतू. या बखरीमध्ये एक गमतीदार प्रसंग आहे, तो असा - 'शिवराजभूषण' या काव्याचा कर्ता कवी भूषण हा मूळचा उत्तरेकडचा. यवनांचे अन्न भक्षावयाचे नाही, म्हणून हा दक्षिणेकडे आला. शिवाजीराजांजवळ राहून त्याने 'शिवराजभूषण' हे काव्य रचले. नंतर महाराजांची आज्ञा घेऊन तो दिल्लीस गेला. औरंगजेबाने त्याला दरबारात बोलावले व हुकूम केला, 'काही वर्णन करावे.' तेव्हा तो म्हणाला, 'आपण हात धोवून बसावें.' आम्ही वीररस वर्णन करूं, ते समयी आपला हात मिशांवर जाईल .... कारण आपणांस शृंगार प्रिय, ... त्याचे वर्णन ऐकताना आपला हात विजारेस लागतो, याकरिता हात धोवावा.' नंतर भूषणाने जेव्हा शिवाजीराजांचा प्रताप वर्णिला, तेव्हा औरंगजेबाने हुकूम केला, "आम्हांविषयी कवित्व करावे. सार्वभौमपद आमचे, सर्व राजे आम्हांस करभार देऊन मांडलिक होत, ऐसे वर्णावे." तेव्हा भूषणाने पुढीलप्रमाणे वर्णन केले, 'पृथ्वीतील सर्व राजे पुष्पवृक्ष होत आणि आपण पादशहा भ्रमर, सर्वांचा मधु सेवन करणार.' बखरकार पुढे लिहितो, 'त्यात शिवाजीराजे हे चंपकवृक्ष होत, ऐसे वर्णिले, की चंपकास भ्रमर शिवत नाही.'

प्रसंग मनोरंजक आहे. तो वाचताना त्यातील 'चंपक - भ्रमर न्यायाने' लक्ष वेधून घेतले. या संदर्भातील पुढील सुभाषिते प्रसिद्धच आहेत.

भ्रमन् वनान्ते नवमंजरीषु न षट्पदो गंधफलीमजिघ्रत् ।
सा किं न रम्या स च किं न रन्ता बलीयसी केवलमीश्वरेच्छा ।

'गंधफली' म्हणजे सोनचाफ्याची कळी. वनांतरी नवनवीन मंजिऱ्यांवर झेपावणारा भ्रमर या कळीला शिवतही नाही. याचा अर्थ तो रमणीय नव्हता वा तो भ्रमरही रमणारा नव्हता, असा नव्हे पण ईश्वरेच्छा बलीयसी!



अनुक्रमणिका






अन्योक्ति प्रकरणात 'चंपक'ला उद्देशून पुढील श्लोक आहे -

रूपसौरभसमृद्धिसमेतं चंपकं प्रति ययुर्न मिलिन्दाः ।
कामिनस्तु जगृहुस्तदशेषा ग्राहका हि गुणिनां कति न स्युः ॥

रूपगंधाने समृद्ध असणाऱ्या त्या सोनचाफ्याकडे ते बेटे भुंगे न येवोत. कामीजन तर त्यांना स्वीकारतात ना?

गुणग्राहक लोक काय जगात थोडे आहेत?

- हे उल्लेख सुभाषितांतील. संस्कृत काव्यात हा न्याय कुठे आहे का? संस्कृतशी माझा संबंध तसा संदर्भ पाहण्यापुरता. नाही म्हणायला एम्.ए.ला दुय्यम स्तरावर संस्कृतचे दोन पेपर होते. एका पेपरला नैषधाचे तीन सर्ग होते. (त्याचा धसका अजून कायम आहे.) पण स्मृतींमध्ये कुठेतरी त्यातील काही कल्पना पडून असाव्यात. म्हणून जुन्या पुस्तकांचे कपाट धुंडाळले. त्यात जवळजवळ पंचेचाळीस वर्षांपूर्वी अभ्यासलेली प्रा. एस्.व्ही. दीक्षित संपादित नैषधाच्या तीन सर्गांची इंग्लिश प्रत मिळाली. थोडीशी चाळताच पुढील श्लोक मिळाला -

विचिन्वतीः पांथपतंगहिंसनैरपुण्यकर्माण्यलिकज्जलच्छलान् ।
व्यलोकयच्चम्पककोरकावलीः स शम्बरारेर्बलिदीपिका इव ॥ (१.८६)

प्रसंग आहे विरहार्त नलाच्या वनविहाराचा. त्याला तेथे दिसल्या सोनचाफ्याच्या कळ्या. कवी त्या कळ्यांना मदनाचे पूजादीप म्हणतो. या दीपांवर काजळी धरावी तसे कळ्यांवर काळे भुंगे होते. हे दीप जणू काळे पाप त्या भुंग्यांच्या बहाण्याने व्यक्त करीत होते. पाप कसले? दीपाकडे पतंग झेपावतात व मरतात. येथे विरहार्त वाटसरू चाफ्याच्या कामोत्तेजक सुगंधानेच घायाळ होऊन मृत होत होते. चाफ्याच्या फुलांकडे भुंगे एक तर फिरकत नाहीत व फिरकलेच, तर ते मरतात - हा कविसंकेत या कल्पनाविलासाच्या बुडाशी आहे. (कोण ही यातायात!)

नैषधावर ज्या संस्कृत टीका आहेत, त्यात 'नारायण' नामक टीकाकाराची 'नैषधायप्रकाश' ही एक महत्त्वाची टीका मानली जाते. प्रा. दीक्षितांनी उपरोक्त श्लोकावरील त्याच्या टीकेच्या उद्धृत केलेल्या दोन ओळी अशा -

'चम्पकोपरि भ्रमरो न तिष्ठति इति केचिन् । तत्र तिष्ठति
परंतु म्रियते इति प्रामाणिकाः ।' (दीक्षित संपादित प्रत पृ. १०२)

नारायणाने येथे 'प्रामाणिकां'ची म्हणजे 'प्रमाणसिद्ध बोलणाऱ्यां'ची काढलेली साक्ष मला महत्त्वाची वाटते. कारण त्यावरून चाफा व भुंगा यांचे शत्रुत्व हा केवळ

कविसंकेत वा कविसमय राहत नाही. कारण, 'संकेत वा समय हा अशास्त्रीय, अलौकिक व केवळ परंपराप्राप्त असतो' असे साहित्यशास्त्री सांगतात.

भुंग्याच्या चाफ्याशी असणाऱ्या या नात्याचा मराठीत मोरोपंतांनी उपमानार्थ उपयोग करून घेतला आहे. मंत्रभागवताच्या आठव्या स्कंधात असुरांचा राजा बळी व देवांचा राजा इंद्र यांच्या युद्धाची हकीगत येते. या युद्धामध्ये असुर हरले. पंत लिहितात -

बळिला असुर उठविती, खवळे तो शत्रुनीं बहु च्छाळिला ।
कळिला करिं, परि हितकर युद्ध न तें काशकुसुम त्या अळिला ॥

- या आर्येतील चतुर्थ चरणात स्वतः पंतांच्या हस्तलिखितातच पुढील पाठभेद आहे - 'केतकचि तया अळिला ॥'

(मोरोपंतकृत मंत्रभागवत ८.७१ पादटीप)

भावार्थ असा - असुरांनी बळीला युद्धार्थ उठविले. तोही खवळला, परंतु त्याच्या शत्रूंनी - देवांनी त्याला त्रस्त केले. बळीने भांडण (कळि) केले खरे, परंतु भ्रमराला ज्याप्रमाणे काशकुसुम (किंवा पाठभेदानुसार चाफ्याचे फूल) हितकर नसते, त्याप्रमाणे ते युद्ध बळीला हितकर ठरले नाही.

आता येथे चाफ्याऐवजी काशपुष्पाचा उल्लेख आहे, तोही लक्षणीय. काश = लव्हाळे, नागरमोथा. याचेही फूल भुंग्याला तापदायक ठरते का? मला संदर्भ मिळाला नाही.

अर्थात वास्तविक व लौकिक अशा घटनाही कवी अर्थ-निबंधनासाठी उपयोगात आणतातच. ही घटना त्यापैकीच एक. कोकिळेच्या परभृतत्वाचा उल्लेख असाच नाही का? दृष्टान्तासाठी कवींनी तो चांगलाच राबवला आहे. शाकुन्तलातील 'अन्यैर्द्विजैः परभृता खलु पोषयन्ति ।' (५.२२) हे दुष्यन्ताचे व मृच्छकटिकातील 'परभृत इव नीडे रक्षितो वायसीभिः ।' (७.३) हे आर्यकाचे उद्‌गार प्रसिद्धच आहेत. मात्र या परभृतत्वाच्या बाबतीत एकट्या कोकिळेचाच बोभाटा अधिक झालेला आहे. वस्तुस्थिती अशी आहे की, तिच्याप्रमाणेच चातक व पावशा हे पक्षीही परभृतच आहेत. या दोघांच्याही माद्या प्रायः सातभाईंच्या घरट्यात आपली अंडी घालतात, पण कवींना कौतुक आहे ते चातकाच्या मेघाराधनेचे व पावशाच्या 'पेर्ते व्हा' या आवाहनाचे.

सोनचाफा व भुंगा यांच्या सापत्ननात्याचाही उल्लेख असाच वस्तुस्थितीवर आधारित आहे. आमचा अनुभव सांगतो. भुंग्यांची एक जात 'गेंडा भुंगेरा' म्हणून

ओळखली जाते. आमच्याकडे तिला 'भोर' म्हणतात. (- आणि बांबू पोखरणाऱ्या भुंग्याला 'घोंगेरा' म्हटले जाते.) हा 'भोर' माडाचा = नारळाच्या झाडाचा शत्रू आहे. माड लहान असताना त्याच्या शेंड्याच्या गाभ्यात हा जातो व तो पोखरतो. स्वाभाविकच काही दिवसांनी शेंडा गळून पडतो. या भोराच्या नाशासाठी हल्ली कीटकनाशके वापरतात; परंतु पूर्वी आमच्याकडे अनेकजण सोनचाफ्याची फुले माडाच्या शेंड्याजवळ झापांमध्ये ठेवीत. त्यामुळे हे भोर दूर राहत. आजही सोनचाफ्याची फुले भरपूर प्रमाणात मिळाल्यास हा उपाय केला जातोच. तेव्हा नारायणाने प्रामाणिकांचा केलेला उल्लेख बरोबरच आहे. अर्थात सोनचाफ्याच्या फुलांची 'ॲलर्जी' फक्त या भोरांनाच आहे की सर्वच प्रकारच्या भ्रमरांना, हे मला माहीत नाही.

चाफा आणि भुंगा यांचा हा सापत्नभाव साहित्यात केव्हा रूढ झाला? दुर्गाबाई भागवतांनी महाभारताच्या संशोधित प्रतीच्या आधारे कर्णपर्वातील एक श्लोक उद्‌धृत केला आहे. प्रसंग आहे धृष्टद्युम्न व दुर्योधन यांच्या लढाईचा. दुर्योधनाने धृष्टद्युम्नाच्या मस्तकावर अनेक बाण मारले. त्यामुळे तो कसा दिसला? महाभारत सांगते -

तस्य तेऽशोभयन् वक्त्रं कर्मारपरिमार्जिताः ।
प्रफुल्लं चंपकं यद्‌वद्‌भ्रमरा मधुलिप्सवः ॥

(कर्णपर्व अ. ५६ - श्लोक ३०-३२)

येथे 'चंपक' ऐवजी 'कमल' असा पाठभेद तळटीपेत नमूद केल्याचे दुर्गाबाई सांगतात. (आत्ता माझ्या हाताशी असलेल्या गीता प्रेस, गोरखपूर प्रतीत 'पंकज' असाच पाठ आहे.) त्या पुढे लिहितात, 'हा पाठभेद मला महत्त्वाचा वाटतो. चंपकभ्रमर संकेत महाभारतकाळी रुळला होता की नाही, याबद्दल शंका निर्माण होते. कदाचित पुष्प व भ्रमराचे सार्वत्रिक साहचर्य मानले गेल्यामुळेही याबाबतीत दुर्लक्ष होणे साहजिक आहे.' (लोकसाहित्याची रूपरेखा - दु.आ. १९७७ - पृ. ५०९)

लोकसाहित्यातील भुंग्याविषयीचे संकेत तसे मजेदारच आहेत. तेथे भुंगा 'अमर' आहे. या संदर्भात दुर्गाबाई लिहितात, 'कोकणात या भुंग्याला भांबुरडा म्हणतात. समुद्राच्या वरदानाने तो अमर आहे. फक्त सोमवारीच मारले तर त्याला मरण येते, अशीही समजूत आहे.' (उक्त - पृ.५१२)

याला पूरक अशी माझी आठवण सांगतो. आमच्याकडे उन्हाळी अंगणात

माडाच्या विणलेल्या झापांचा मांडव असे. त्याखाली आधाराला बांबू असत. 'घोंगेरे' (भुंगे) ते बांबू पोखरीत. मग आम्हां मुलांना त्यांची केरसुणीने शिकार करावी लागे. या उपद्व्यापात एखादाच मरे. मात्र सोमवारी भुंगा मारण्याला आमच्या आजीची बंदी होती. कदाचित एखादा मारलाच तर तो तुळशीखाली पुरावा लागे. म्हणजे मग तो भुंगा शंकराकडे जाई. (जिवाला प्राप्त होणारे ते शिवत्व होते.)

अवैदिक परंपरेतील भुंग्याच्या भूमिकेविषयी दुर्गाबाई सांगतात, 'भ्रमर हा मृताचा आत्मा, जीवाचे प्रतीक किंवा मृताशी संबंध असलेला महत्त्वाचा प्राणी आहे.' (उक्त पृ.५१७) दुर्गाबाईंनी कथासरित्सागरातील विमलबुद्धीच्या कथेचा केलेला उल्लेख आता लक्षात घेऊ. दुर्गाबाईंनी ही कथा 'मदनमंचुकालंबा'त असल्याचे म्हटले आहे, परंतु ती तेथे नसून 'शशांकवती' या लंबकात आहे. तेव्हा मूळ कथासरित्- सागराच्या आधारेच ती पाहू.

विमलबुद्धी हा मृगांकदत्त राजाचा एक मंत्री. ब्रह्मदंडी नामक ऋषींच्या आश्रमाभोवती हिंडताना त्याला एक गुहा दिसली. तेथे एक रत्नजडित मंदिर होते. त्यामध्ये एक स्त्री भुंग्यांनी भरलेले चक्र फिरवीत होती. जवळच एक बैल होता व एक गाढव होते. ते भुंगे त्यांच्यावर बसले. बैलावर बसलेल्या भुंग्यांनी त्या बैलातून निघणारे दूध प्राशन केले व ते पांढरे झाले. गाढवावर बसलेल्यांनी त्याचे रक्त प्राशन केले व ते काळे झाले. नंतर ते भुंगे जाळी विणणारे कोळी झाले. स्वतःतून निर्माण केलेली ती जाळी पांढऱ्या भुंग्यांनी उत्तम फुलांवर व काळ्या भुंग्यांनी विषारी फुलांवर विणली. त्यातच ते लटकून राहिले. नंतर एका द्विमुख सर्पाने त्यांना दंश केला. त्यामुळे ते जाळ्यातून बाहेर पडू लागले. तेव्हा एका स्त्रीने त्यांना विविध घरांमध्ये टाकले, पण ते पुन्हा जाळ्यात लटकू लागले. नंतर ते रडू लागले. त्यामुळे समाधी भग्न झालेल्या कुणा तापसाने ती जाळी नष्ट करून त्यांना मुक्त केले. तेव्हा एका झाडाच्या ढोलीत ते शिरले व तेथील प्रखर तेजामध्ये लीन झाले.

विमलबुद्धीला दिसलेल्या या विलक्षण दृश्याचा उलगडा नंतर त्या ब्रह्मदंडी ऋषीने केला, तो असा - चक्र फिरविणारी स्त्री म्हणजे माया. चक्र हे संसारचक्र. भुंगे हे विविध प्राणी. बैल हा धर्म; गाढव हा अधर्म. त्यामुळे ते भुंगे अनुक्रमे पांढरे व काळे झाले. आपल्या सुकृत-दुष्कृतानुसार ते पांढरे-काळे कोळी झाले व स्वतःच्या वीर्यापासून निर्माण केलेल्या मुलाबाळांच्या जाळ्यात ते अडकले. द्विमुख सर्प हा काळ. आपल्या शुभाशुभ कर्मानुसार ते मारले गेले व नंतर त्या स्त्रीने त्यांना

विविध घरांमध्ये म्हणजे विविध योनींमध्ये जन्माला घातले. दुःखाने त्रस्त होऊन जे परमेश्वराला शरण आले, त्यांचे पाश ज्ञानरूपी अग्नीने जळून गेले व ते आदित्यमंडलामध्ये विलीन झाले.

(कथासरित सागर - शशांकवती लंबक-तृतीय तरंग श्लोक - ८३ ते ११७)

'भृंगास्ते च जंतवः' हा येथे सूचित झालेला कल्पनाबंध महत्त्वाचा आहे. दुर्गाबाई सांगतात, 'भ्रमराचा मृतात्म्याशी असणारा संबंध हा एक जागतिक कल्पनाबंध आहे,' (पूर्वोक्त पृ.५१८) 'स्वर्गात पितरांशी संबंध ठेवणारा भुंगा हा महाराष्ट्रातील कोकणस्थ कुणब्यांच्या परिचयाचा असल्याचे' सांगून पुढे दुर्गाबाईंनी क्रुकच्या साक्षीने (Crook - Introduction to popular religon & folk lore of Northern India.) उत्तर प्रदेशातील कामी लोकांच्या एका प्रथेचा उल्लेख केला आहे. हे लोक सुतकानंतर मृतासाठी पत्रावळीवर अन्न ठेवतात व कुणाही कीटकाने त्याला स्पर्श करताच मृताला ते अन्न मिळाल्याचे मानतात. (पूर्वोक्त पृ. ५१९)

यावरून आपल्या परिचित काकस्पर्शाची आठवण यावी. या प्रथेत मृताचा आत्मा कावळ्याच्या रूपाने येतो, असे मानले जाते. कावळा अमर आहे, अशीही एक समजूत आहे. ती लक्षात घेतली, की भ्रमरादी कीटकविश्वाशी असणारे त्याचे वेगळे नाते समजून येते व एक कल्पनाबंध पूर्ण होतो.

हे झाले भुंग्याविषयी. चाफ्याचे काय? शोध घेऊया. शंकराने मदनाला जाळले, ही कथा आपल्या परिचयाची आहे. मदनाचे धनुष्य फुलांचे व बाणही फुलांचे, परंतु त्याच्या बाणरूप फुलांमध्ये 'चंपक' नाही. ह्या संदर्भात पुढील श्लोक प्रसिद्धच आहे -

अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका ।
नीलोत्पलं च पञ्चैते पञ्चबाणस्य सायकाः ॥

(येथे आणखी एका माहितीची नोंद करून घेऊया - 'ब्रह्मवैवर्त' पुराणात मदनाचे पाच बाण पुढीलप्रमाणे दिले आहेत -

मारणं स्तम्भणं चैव जृम्भणं शोषणं तथा ।
उन्मादनं पञ्चबाणान् पञ्चबाणो बिभर्ति सः ॥)

'वामन पुराण' सांगते, शंकराने मदनाला दग्ध केले तेव्हा त्याने आपले धनुष्य फेकून दिले. त्या वेळी त्या धनुष्याचे जे तुकडे झाले, त्यापैकी सुवर्णमय मुष्टिबंधातून 'चंपक' निर्माण झाला.

चाफ्याच्या उत्पत्तीविषयी काही लोककथाही आहेत. बंगालमधील एक कथा

सारांशरूपाने अशी - एका राजाला चार राण्या होत्या. त्यांतील मोठी गर्भवती झाली. बाकीच्या राण्या स्वाभाविकच तिचा द्वेष करू लागल्या. यथावकाश मोठी राणी प्रसूत झाली. त्या वेळी ती बेशुद्ध असताना बाकीच्या राण्यांनी तिला झालेला मुलगा पळविला व बागेत पुरून टाकला. त्याच्या जागी एक दगड आणून ठेवला. असे सात वेळा घडले. आठव्या वेळी मुलगी झाली. तिचीही तशीच वाट त्या राण्यांनी लावली. राजाला वाटले, मोठी राणी अपयशी आहे. म्हणून त्याने तिला वाड्यातून बाहेर काढले व एका झोपडीत ठेवून दिले. पुढे ते मुलगे पुरलेल्या जागी चाफ्याची सात झाडे उगवली. मुलगी पुरली होती त्या जागी पारुल नामक वृक्षाचा रोपा उगवला. सर्व झाडे यथावकाश फुलू लागली. परंतु होई असे, की ती फुले कुणाच्या हाती लागत नसत. फक्त त्या मुलांची आई असलेली मोठी राणी फुले तोडायला आली की झाडे वाकत व तिला फुले तोडू देत. राजाला हे कळले, तेव्हा तो स्वतः बागेत आला. तेव्हा त्या चाफ्याच्या झाडांनी मनुष्यवाणीने राजाला त्या तीन राण्यांचे क्रूर कारस्थान सांगितले. राजाने ती झाडे उपटून खड्डे खणले. त्यातून सात राजपुत्र व एक राजकन्या अशी सर्व बाहेर आली. स्वाभाविकच राजाने मग मोठ्या राणीला वाड्यात घेतले व बाकी तिघींची हकालपट्टी केली. (उद्‌धृत - संस्कृतिकोश - द्वितीयावृत्ती १९८७ - खंड ३ - पृ. ३०३)

ही कथा वाचीत असताना माझ्या आठवणी पुन्हा एकदा चाळवल्या गेल्या. यासारखी कुठलीतरी गोष्ट लहानपणी कुठेतरी वाचली असल्याचे वाटू लागले. मग जुन्या अंकांचे कपाट धुंडाळले. त्यामध्ये लहानपणी वाचलेले 'आनंद' मासिकाचे अंक मिळाले. ते चाळता चाळता एकाएकी जाने. १९३९ सालचा अंक हाती आला. त्यामध्ये गोष्ट मिळाली. गोष्टीचे नाव - 'चाफ्याची झाडे झालेले सात भाऊ.' लेखक - प्रो. ज.नी. कर्वे. त्या वेळी नुकत्याच प्रकाशित झालेल्या 'एक होता राजा' या कथासंग्रहातून ही कथा तेथे घेतली असल्याचा उल्लेख आहे. ही कथा उपरोक्त बंगाली लोककथेसारखीच आहे. काही तपशिलाचे फरक आहेत, तेवढेच! या कथेतील राजाला सात राण्या होत्या. मोठी गर्विष्ठ व उद्धट होती. धाकटी गरीब व दयाळू होती. एका साधूच्या आशीर्वादाने धाकटीला सात मुलगे व एक मुलगी झाली. बाकी राण्यांनी हे मुले पळवली व त्यांच्या जागी सात बेडूक व एक चिचुंद्री आणून ठेवली. ती आठ मुले मडक्यात घालून पुरून टाकली. राजाला धाकटीचा राग आला. त्याने तिला वाड्याबाहेर हाकलले. इकडे मुले पुरल्या जागी चाफ्याची सात झाडे व एक जास्वंदीचे रोप उगवले. त्यांना यथावकाश फुले आली. राजाचा

माळी फुले काढायला आला. जास्वंद म्हणाली, 'भाऊ, तुम्ही जागे आहात ना? राजाचा माळी फुले काढायला आला आहे, त्याला फुले द्यायची का?' चाफ्याच्या झाडांनी एकदम उत्तर दिले, 'नाही. राजाला येथपर्यंत येऊ दे. मग पाहू.' राजाला हे कळले, तेव्हा तो आला; त्या सहा राण्याही आल्या. चाफ्याची झाडे म्हणाली, 'धाकट्या राणीला बोलवा. म्हणजे आम्ही सगळी तिच्या स्वाधीन होऊ.' तिला बोलावण्यात आले. ती येताच सर्व फुले तिच्या स्वाधीन झाली व त्यातून सात राजपुत्र व एक राजकन्या बाहेर पडली.

या दोन्ही कथांतील साम्य सहज लक्षात येण्यासारखे आहे. यातील चाफा हा मृत्यूवर मात करून उगवलेला जीव आहे काय? तसे असेल, तर मृतात्म्याचे प्रतीक असणारे भुंगे त्यापासून दूर राहावेत, हे स्वाभाविक म्हणायला हवे.

परंतु असे निष्कर्ष काढणे योग्य नव्हे. कारण लोककथांतून व्यक्त होणारे लोकमन कसे धावेल, ते कोण सांगणार? तो चंचल पारा कार्यकारणभावाच्या चिमटीत पकडण्याचा वृथा प्रयत्न न करता येथेच थांबावे, हे बरे.

■

**मु. पो. चौल, ता. अलिबाग, जि. रायगड - ४०२२०३.**





अनुक्रमणिका







# मराठीचे ममत्व कशासाठी?

शंकर वैद्य

मराठी भाषेच्या संबंधात काही विचार आपल्यासमोर मांडतो. गेली अनेक वर्षे भाषाविषयक लढ्यात आपण सारे भारतीय गुंतलेले आहोत. हे संघर्ष कशासाठी, याच्या मूळ कारणाकडे मात्र आपले हवे तितके लक्ष जाईनासे झाले आहे.

सामाजिक जीवनात असलेल्या भाषेच्या महत्त्वाविषयीची जाण वाढून स्वातंत्र्योत्तर काळात ती ती भाषा, तिच्यातील साहित्य आणि त्याद्वारे व्यक्त होणारी संस्कृती यांच्या जपणुकीसाठी आणि विकासासाठी, सबंध भारतात भाषावार प्रांतरचना करावी, अशी मागणी भारतातील सर्व प्रांतांतून केली जाऊन लवकरच पुढे भाषावार प्रांतरचना अस्तित्वात आली. मात्र हे सुखासुखी घडले नाही. यात राजकारण शिरले आणि देशभर कडवटपणा निर्माण झाला. त्यातले काही प्रश्न आज चाळीस वर्षे झाली, तरी अजूनही धुमसत आहेत. भाषेची बाजू मांडताना काही घोषवाक्ये सतत उच्चारली गेली आहेत : 'मराठी आमची मातृभाषा आहे, ती टिकविली पाहिजे', 'मातृभाषेतून शिक्षण दिले की ज्ञानाचा पाया पक्का होतो', 'मराठीचा विकास हाच महाराष्ट्राचा विकास.' इत्यादी वाक्ये सतत कानावर पडत असतात.

हे सारेच म्हणणे अर्थपूर्ण आणि योग्य असेच आहे; पण मुख्य प्रश्न असा आहे की, नुसते 'मातृभाषा', 'मातृभाषा' म्हणून भागणार नाही; तिचे-माझे असे काय नाते आहे की त्यासाठी आम्ही प्राणपणाने लढावे? ती गेली तर माझे काय नुकसान होणार आहे? तिच्या जागी दुसरी भाषा आली तर काय बिघडेल? 'मराठीवर अन्याय', 'मराठीची गळचेपी', 'मराठी गेली तर ...' असे म्हणत वर्षानुवर्षे आम्ही निकराने का लढत आहोत? हाच प्रश्न मला तपासून पाहावासा वाटतो आहे.

भाषा ही आपली बोलण्याची नित्याची बाब झाली म्हणून हा एक चमत्कार आहे, हे आपल्या लक्षात येत नाही; पण बारकाईने पाहिले तर तो एक चमत्कार आहे, असे ध्यानात येईल. मी तोंडाने काही आवाज काढतो आहे, काही ध्वनी

उच्चारतो आहे आणि त्यांनी आपणांस काही अर्थबोध होतो आहे, क्वचितप्रसंगी तुमच्या भावनांनाही स्पर्श होतो आहे, हे ध्वनी ऐकताना मनात काही प्रश्न तयार होताहेत आणि तेही तुमच्या मनात सूक्ष्मपणे जागृत होणाऱ्या ध्वनिचिह्नांतूनच तुम्हांला कळताहेत या घटनेला, या प्रक्रियेला चमत्कार नाही म्हणायचे तर काय? एका उदाहरणाने हे स्पष्ट करता येईल. 'आ' या आवाजाला एक ध्वनी यापलीकडे काय अर्थ आहे? काही नाही. तीच गोष्ट 'ई' या ध्वनीची. परंतु 'आ' आणि 'ई'चा एकत्रित उच्चार केला तर आई हा उच्चार तयार होऊन 'आई' ही व्यक्ती डोळ्यांसमोर येईल. याबरोबर मनात तिच्या लाभलेल्या, न लाभलेल्या वात्सल्याची छटाही जागी होऊन जाईल. मात्र ही अशी मानसिक हालचाल मराठी भाषा असणाऱ्या वा तिची जाण असणाऱ्या व्यक्तीपुरतीच घडेल. मराठीचा गंध नसणाऱ्या पाश्चिमात्य देशातील माणसापुढे 'आई' या शब्दाचा उच्चार केला तर माझ्या मनातील अर्थाचा त्याला काहीही बोध होणार नाही. फार झाल्यास मला प्रतिसाद म्हणून तो 'हाय' करील एवढीच एक शक्यता. जी गोष्ट 'आ' आणि 'ई' या दोन ध्वनींची तीच गोष्ट इतर अनेक नादरूपांची, ध्वनींची. या ध्वनींतूनच अर्थपूर्ण अशी शब्दसृष्टी उभी राहते, या शब्दांतूनच भाषा आकार घेते. एखाद्या विशिष्ट भाषेच्या परिसरात जन्म घेणाऱ्या व्यक्तीचे जीवन त्या परिसराच्या भाषेशी निगडित होते.

या प्रदेशात हीच भाषा का अस्तित्वात आली, याचे पूर्ण समाधानकारक उत्तर मात्र आपणांस देता येत नाही. भाषानिर्मितीच्या मागे जी अगणित कारणे असतात, त्या सर्वांची मोजदाद होऊ शकत नाही.

भाषेच्या दृष्टीने विचार करता माझे आयुष्य आणि भवितव्य मराठी भाषेशी, मी तिच्या परिसरात जन्मलो, वाढलो म्हणून बांधले गेलेले आहे. माझ्या जन्मापासून माझ्या कानावर ध्वनिसंस्कार झाले, ते मराठी शब्दांचे. मी बोलतो आहे ही एक भाषा आहे आणि तिचे नाव 'मराठी' आहे हे मला कळण्यापूर्वीच मी ही भाषा बोलू लागलो होतो; माझं मनोगत तिच्यातून व्यक्त होऊ लागलं होतं. माझ्या भावना, माझे विचार त्याच भाषेतून प्रकट होत होते. मला स्वप्ने पडत होती ती मराठीतूनच आणि मी बडबडत होतो, तेही मराठीतूनच. ही माझी भाषाच माझ्या कुटुंबाची भाषा होती, हीच माझ्या भोवतालच्या समाजाची भाषा होती, हीच माझ्या पाठांतरात असलेल्या भूपाळ्यांची, आरत्यांची भाषा होती; आणि हिच्यामुळेच एक 'मराठी माणूस' म्हणून मी ओळखला गेलो. हिच्यातून मला जग कळत गेलं.

कसं ते बघा –

आपण जन्माला येतो तेव्हा एक अर्भक, एक तान्हं मूल या अवस्थेत आपण असतो. त्या आपल्या लहानग्या डोळ्यांना आपल्या भोवतालच्या वस्तूंचा, माणसांचा काय बोध होत गेला असेल, हे आपणांस सांगता येणार नाही. पण आपणास कालांतराने कदाचित वस्तूंच्या आकाराचा बोध, स्पर्शाचा, चवीचा बोध अल्पसा होत गेला असावा. म्हणजे काही संवेदनांची जाण तेवढी झाली असावी. नंतर मग हळूहळू 'दुदू, गाईगाई, भुडूभुडू, मंमं, चिऊकाऊ, भूभू, शी-सू, आई-ताई' अशा मऊमऊ शब्दांशी आपलं नातं जुळत गेलं असावं.

हे असं केवळ एखाद्याच मराठी घरात घडत जातं, असं नाही; तर मराठी बोलणाऱ्या प्रत्येक घरात हे घडतं, गावागावांत हे घडतं, म्हणजे उभ्या महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरच्या मराठी भाषक समाजातही घडतं. 'दुदू, चिऊकाऊ, हम्मा' असे शब्द सर्वांनाच योग्य, उपयुक्त आणि आपले वाटून ते सहजपणे सर्वांचे होतात. अशा रीतीने लहानपणापासून भाषेशी आपला संबंध येतो आणि ती भाषा आपली होत जाते. याच पद्धतीने मराठी माझी मातृभाषा झाली. या भाषेद्वारेच मला भोवतालच्या वस्तुजाताचं, व्यवहाराचंही ज्ञान होत गेलं. झाड, डोंगर, गाय, म्हैस, भात-भाकरी, खाऊ अशा डोळ्यांना दिसणाऱ्या वस्तूंचं, प्राण्यांचं, पदार्थांचं ज्ञान होऊ लागलं, त्यांचे गुणधर्म कळू लागले. यांतच 'मी, तू, आपण, आम्ही, हा, ही, हे, तो, ती, ते' या सर्वनामांचा (ती सर्वनामे आहेत हे न कळताही) बोध होऊ लागला. एवढंच काय; पण 'सुख-दुःख, प्रेम, विरह, व्यथा, ईर्ष्या, अभिमान' अशा भावछटाही मला शब्दांतून जाणवू लागल्या. याचबरोबर अनेक न दिसणाऱ्या गोष्टी - 'जीव, आत्मा, परमात्मा, माया, ब्रह्म, मन' हेही समजू लागले आणि याचबरोबर 'सत्त्व, तत्त्व, महत्त्व, ममत्व' असे शब्दही कळू लागले. 'काल-आज-उद्या'चा बोध होऊ लागला. क्रियापदांची रूपे, त्यांनी दर्शविला जाणारा काळ, यांचे भान येत गेले. अशा रीतीने मराठी भाषेचा आणि माझा संबंध सहजपणे जुळत गेला. माझ्या कुटुंबाच्या आणि समाजाच्या व्यवहारातून, तसेच शालेय अभ्यासातून शब्दातील अर्थाचे माझ्या वैयक्तिक अनुभवाशी नाते जुळून तो संबंध घट्ट , घनिष्ठ, दृढ, पक्का होत गेला.

आता या भाषेतून मी भावना प्रकट करू शकतो, विचार, चिंतन करू शकतो, एखादी घटना आठवू शकतो, ती इतरांना सांगू शकतो, या भाषेतून मी गीते गाऊ शकतो, कविता लिहू शकतो आणि संतापून शिव्याशापही देऊ शकतो.

या भाषेमुळेच माझा अनुभव मला स्वतःला कळतो. 'मी आहे' या माझ्या अस्तित्वाचा आणि जगाच्याही अस्तित्वाचा बोध मला या भाषेमुळेच होतो. या भाषेमुळे मी परंपरेचा घटक बनतो. समाज मला भाषा देतो, मी त्या भाषेत लिहून समाजाला काहीतरी देत असतो अशी ही देण्याघेण्याची क्रिया चालू राहते. आता ही भाषा माझी जीवनसाथी आहे, नव्हे; ती या नात्याहूनही अधिक जवळची आहे. ती माझ्या मनाशी एकरूप झालेली आहे. तिच्या आधारे अगदी विजेच्या वेगाने माझ्या मनात अनेक जाणिवा स्फुरत असतात आणि कल्पनांचा उल्का-वर्षाव होत राहतो. अगदी झोपेतही मनाची ही क्रिया सूक्ष्मपणे चालू असते. स्वप्नरूपाने ती प्रत्ययास येते. हे माझ्या संबंधात जे घडले वा घडते, अगदी तसेच ही भाषा बोलणाऱ्या समाजघटकांच्या जीवनातही घडते वा घडलेले आहे, असे खात्रीने म्हणता येते. मराठी मातृभाषा असणाऱ्या माणसांना 'मराठी माणसे' म्हणून ओळखतात. ही मराठी भाषा आणि ती बोलणारी माणसे यांच्या एकरूपत्वाचीच खूण आहे. मराठीचे आणि आपले असे नाते असल्याने परदेशात एखाद्या अनोळखी व्यक्तीच्या तोंडून 'कुठून आलात?' असे दोन शब्द ऐकले तरी घरचंच कोणीतरी भेटल्यासारखं वाटतं. क्षणात त्या व्यक्तीशी आपलेपणाचे नाते निर्माण होते. कारण त्या दोन शब्दांनी आपणांस एका समान परंपरेची ओळख पटलेली असते.

शाळेत शिकत असताना शिक्षकांनी भाषांतरासाठी दिलेली परदेशी नेलेल्या पोपटावरली एक इंग्रजी कविता आठवते : परदेशी गेलेला पोपट एकाकी अवस्थेत पिंजऱ्यात कुढत असताना त्याच्याच मायदेशाचा एक माणूस त्याला भेटून 'विठू विठू पोपट' असं काही म्हणाला, तेव्हा त्या पोपटाने प्रचंड कलकलाट केला आणि त्या पिंजऱ्यातच प्राण सोडला. या कवितेचं मर्म आता कळतं. त्या वेळी ते देशाच्या पारतंत्र्याच्या संबंधात समजलं होतं; आता ते भाषिक संबंधात उमजतं आहे.

भाषेचा आणि आपला संबंध जाणून घेताना आणखी एक मुद्दा मनात बाळगला पाहिजे : भाषा ही ध्वनींच्या आधारे उभी असली तरी ती केवळ ध्वनिरूपांमध्ये अस्तित्वात नसते; तर ते ध्वनी अर्थरूप धारण करून शब्दरूपांत अस्तित्वात आलेले असतात आणि त्या शब्दांच्या द्वारे आपण आपले मनोगत व्यक्त करीत असतो, तसेच आपला व्यवहारही करीत असतो. भाषा तिच्या प्रारंभ-काळात वाच्यार्थाशी निगडित असते. तिची शब्दसंपत्ती हळूहळू वाढत असते. व्यवसाय वाढतात, अनुभवक्षेत्रे वाढतात तसे शब्द वाढत जातात. कौटुंबिक अनुभव, शेती, शिवणकाम, गवंडीकाम, खाण्याचे पदार्थ, नवी यंत्रे, नवे शोध

अशा नाना क्षेत्रांतले शब्द भाषेत निर्माण होत जातात. या भाषेतच हळूहळू सूचितार्थ व्यक्त करण्याची शक्ती येते. मग 'कावळा', 'गाढव', 'बैल', 'घोडी' हे शब्दही त्यांचा मूळ अर्थ सोडून दुसऱ्या अर्थाने योजले जाऊ लागतात. 'प्रसाद' हा शब्द तर प्रसाद, शी, छडीचा मार अशा अनेक अर्थांनी कार्य करताना दिसतो. 'ते दारूत बुडाले', 'त्यांचे डोळे उघडले', अशा लाक्षणिक शब्दरचना अस्तित्वात येतात. सासू सुनेला 'बस, बस' असं औपरोधिक सुरात बोलते आणि सून लगबगीने उठून कामाला लागते, असे खास शालजोडीतले अर्थ व्यक्तविणारे बोलण्याचे अनेक प्रयोग, ढंग, अस्तित्वात येतात. वाक्प्रयोग, म्हणी यांची जोड त्यांना मिळते आणि त्यामुळे भाषा तिच्या पुढील प्रवासात चांगलंच बाळसं धरते.

याच भाषेत साहित्य निर्माण होऊ लागले की भाषा अनेक अंगांनी पुष्ट होते. प्रतिभासंपन्न लेखक-कवी अनेक प्रकारचे शब्दप्रयोग करून, वाक्यरचनेचे प्रयोग करून, त्या भाषेच्या अर्थाभिव्यक्तीच्या कक्षा रुंद करीत असतो. हे अनेक अंगांनी घडते. उदाहरणार्थ, यमक-अनुप्रासादी शब्दालंकार हे भाषेचे अंगभूत गुणधर्म नव्हेत. ते तिचे कर्तव्य नव्हे. तिच्यातून असे अलंकार साधता येतात अशी शक्ती तिच्यात दडलेली आहे, असे फार तर म्हणू; पण यमक-अनुप्रासादी शब्दालंकारांची आणि त्यांच्या विविध प्रकारांची निर्मिती केलेली आहे ती कवींनी. विविध प्रकारची वृत्ते, छंद यांची निर्मितीही कवींनी केलेली आहे. तसेच द्विपदी, त्रिपदी, चौपदी, दशपदी, साडेतीन चरणी अभंग-ओवी अशा काव्यमांडणीच्या रचना आपल्या अनुभवाच्या गरजेप्रमाणे कवींनी निर्माण केल्या आहेत. यातूनच पुढे त्या अभंग ओवीला विशिष्ट आशयाची जोड मिळून एका काव्यप्रकाराचे स्वरूप प्राप्त झाले आहे. शब्दांच्या मांडणीचा तालबद्ध उपयोग करून निर्माण झालेल्या अनेक शैली यांचे श्रेय लेखक-कवी मंडळींचे आहे. यातच प्रतिभासंपन्न लेखक, कवी, नाटककार विशिष्ट भाषेतून साहित्यनिर्मिती करू लागतात, तेव्हा ती भाषा मोठ्या बळाने फोफावू लागते, तिचा विकास होतो आणि तिची मुळे अधिक खोलवर रुजत जातात. याबरोबरच त्या भाषेतून त्या समाज-मनाच्या भावना - बुद्धीचा आणि सांस्कृतिक स्तरांचाही विकास घडत असतो. भाषा ही व्यक्ती आणि समाज यांचे नाते दृढ करणारी प्रभावी शक्ती असते.

भाषेच्या संबंधात हे प्रतिभासंपन्न लेखक-कवींचे कार्य अतिशय मोलाचे ठरते. त्यातून भाषिक कार्यातही नवी भर पडते. त्यातून भाषेची विकसित अवस्था निर्माण होते म्हणूनच त्या भाषेतून विविध प्रकारे अनेक अनुभवविश्वे सहजपणे

फुलतात आणि समर्थपणे व्यक्त होतात.

म्हणूनच बालकवींची 'श्रावणमास' कविता म्हणताना एका निसर्गदृश्याबरोबर एक आनंदमय भावानुभव आपल्या मनात उलगडत जातो. 'प्रेमस्वरूप आई' किंवा 'आई म्हणोनि कोणी' या माधव जूलियन आणि यशवंत यांच्या कविता म्हणताना वात्सल्याने आणि कारुण्याने मन भरून येते. 'गर्जा जयजयकार'च्या घोषाने देशभक्तीच्या भावनेने आपण उचंबळून जातो. 'ने मजसी ने परत मातृभूमीला' म्हणताना मातृभूमीच्या ओढीने मन व्याकुळ बनते. 'कोटिच्या कोटि उड्डाणे' म्हणताना अंगात वेगळाच आवेश संचारतो आणि 'पसायदान' म्हणताना मनाला व्यापकता आणि उदारता येऊन प्राणिमात्रांवरील प्रेमाने अंतःकरण भरून येते; मन शुद्ध होऊन त्याला अनिर्वचनीय शांतीचा प्रत्यय येतो. 'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी'चा परमानंद काही वेगळाच. भावनेच्या, विचारांच्या अनुभवांच्या श्रेणी व्यक्तविण्याचे सामर्थ्य त्या भाषेत आलेले असते; म्हणूनच अशा कलाकृती लिहून होतात. ही भाषा माझ्या समाजात हवेसारखी पसरलेली असते. मनामनांना व्यापून राहिलेली असते. तिचे प्राणालाही व्यापून राहिलेले एक वातावरण - भाषावरण - तयार झालेले असते. म्हणूनच माझ्या एका हुंकाराचाही अर्थ आपणांस कळू शकतो. 'हो, ना, का, वा, छे, हूं' अशा एकेका अक्षरालासुद्धा विशिष्ट प्रसंगाच्या संदर्भात मोठे बळ प्राप्त झालेले दिसते. एखादा कीटकसृष्टीतला कोळी तंतूंनी बांधलेल्या जाळ्यावर जसा सरसरत चौफेर जाऊ शकतो किंवा एखादा तांडेल समुद्राच्या लाटांवरून लीलेने प्रवास करू शकतो, तद्वत समाजभर पसरलेल्या या भाषेच्या जाळ्यावरून आपली मने लीलेने प्रवास करू शकतात, विद्युतवेगाने. आपल्या मनातील आशय व्यक्त करणे, दुसऱ्या व्यक्तींशी संवाद साधणे, आपला जीवन-व्यवहार पार पाडणे, मुख्यतः यासाठी भाषा अस्तित्वात येते; पण माणसाचे मन सौंदर्यलक्ष्यी, कल्पक आणि सर्जनशील असल्याने आपल्या भावनांचा, अनुभवांचा आविष्कार कलात्मक पद्धतीने ते करू लागते. याच पद्धतीने कला-साहित्याचा आविष्कार भाषेच्या माध्यमातून होतो. म्हणून भाषाही विविध अंगांनी फुलत जाते. भाषेतून प्रकट होणाऱ्या साहित्यरूप अनुभवांतून लिहिणाऱ्या व्यक्तीच्या आणि त्याच्या भोवतालच्या समाजाच्या संस्कृतीचे चित्रही अटळपणे उमटत जाते. यात त्या समाजाची घडण, त्याच्या सामाजिक चालीरीती, त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान, त्या समाजाच्या उत्कर्षापकर्षाचा इतिहास, त्याचे आदर्श, त्याची नीतिविषयक दृष्टी, भोवतालचे वस्तुजात, त्याची सौंदर्यदृष्टी, कौटुंबिक

जीवन या साऱ्यांचेच दर्शन, त्या साहित्यकृतीचा आवाका असेल त्यानुसार, कमीअधिक प्रमाणात घडत असते. रामायण-महाभारतासारख्या महाकाव्यांतून ते दर्शन अगदी ठसठशीतपणे व विस्तृतपणे दिसेल तर एखाद्या कथेतून ते छोट्या प्रमाणात आणि पुसटसे दिसेल. या साहित्यामुळे कलानंद मिळतो, मनोरंजन होते; पण त्याचबरोबर मनावर मूल्यसंस्कारही होतो. काही साहित्य तर समाजाची जीवनदृष्टी तयार व्हावी, त्याच्या मनावर मूल्यसंस्कार व्हावा या हेतूनेच लिहिले जात असते. समाजाच्या घडणीसाठी ते अवश्यही असते. केशवसुत ते मर्ढेकर आणि त्यानंतरची सामाजिक कविता पाहिली, तरी ही बोधाश्रयी दृष्टी तेथेही दिसेल. बाकीचे साहित्यही याला अपवाद नाही. केवळ कलावादी साहित्याच्या मुळाशीही काही नैतिक मूल्ये असतातच. अशा रीतीने समाजाच्या संस्कृतीचे, वैचारिक मूल्यांचे दर्शन साहित्यातून घडते. अनेक शतकांची ही कमाई भाषेच्या रूपातून आपल्याला लाभलेली असते. ते भाषेचेच प्रफुल्लित रूप असते. या रीतीने भाषा, साहित्य आणि संस्कृती यांचा त्रिवेणी संगम होऊन एकरूपत्वाने ती भाषा आपल्यासमोर उभी असते. भाषेचा आणि आपला संबंध तुटत गेला, तर या सांस्कृतिक वारशाला आपण पारखे होतो. समाजाच्या विविध क्षेत्रांतील काही धुरीणांना हे समजत असते; पण तात्कालिक लाभापोटी ते या बाबीकडे दुर्लक्ष करतात.

'मराठी भाषेची गळचेपी', 'मराठी भाषेची अवहेलना', 'मराठी भाषेवर अन्याय' असे म्हणत म्हणत 'मराठी गेली तर ...' अशा दचकावून टाकणाऱ्या अशुभ विचारापाशी येऊन आपण सचिंतपणे थांबतो. भाषा अशी नाहीशी होते का? या संबंधात इतिहासाची साक्ष धोक्याची घंटा वाजवणारी आहे, एवढे खरे. आज संस्कृतला प्राप्त झालेली स्थिती पाहिली की मनात धडकीच भरते. ही श्रुति-स्मृतींची भाषा, भारतीय तत्त्वज्ञानाची भाषा, रामायण-महाभारतासारख्या जगविख्यात महाकाव्यांची भाषा, कालिदास, भास, भवभूती, शूद्रक, विशाखदत्त यांच्या उत्तमोत्तम नाट्यकृतींची भाषा, मेघदूत - रघुवंशादी काव्यांची भाषा आणि भरतमुनींसह अनेक साहित्यशास्त्रकारांची भाषा. असं सारं असूनही ती भाषा आज व्यवहारातून गेली, ही वस्तुस्थिती पाहून मनास धक्का बसतो. त्या भाषेची आणि तिच्यातील वैविध्यपूर्ण साहित्याची शक्तीच मोठी म्हणून याही अवस्थेत तिच्याकडे जावे लागतेच आणि तिच्यापुढचा नंदादीप सदैव तेवत ठेवावा लागतो. संस्कृतचे काय; पण तिच्यानंतर उदयास आलेल्या पाली, मागधी, अर्धमागधी, महाराष्ट्री या

प्राकृत भाषाही उदयास येऊन, काही काळ बहरून व्यवहारातून गेल्या. म्हणूनच हे मराठीचेही होऊ शकते, अशी धास्ती मनात बाळगावी लागते, पण बदल होणे म्हणजे नाहीसे होणे नव्हे. भाषा ध्वनींची असल्याने उच्चारात फरक पडून ती बदलत जाणे हे तिच्या स्वभावातच आहे. दर बारा कोसांवर भाषा बदलते, ही समजूत या तिच्या स्वभावाच्या आधारेच अस्तित्वात आली असावी. यादवकाळापासूनही मराठी अनेक प्रकारांनी बदलत बदलत आलेली आहे, हे जुन्या साहित्यकृतीवरून दृष्टिक्षेप टाकला की ध्यानात येते. यातच अन्य भाषेशी तिचा संबंध आला की आदान-प्रदानाच्या प्रक्रियेतून आपल्या भाषेवर त्या भाषांचे काही संस्कार अटळपणे होतात. यातूनच पुढे त्या अन्य भाषेतील साहित्याचे आणि त्याद्वारे त्या समाजाच्या संस्कृतीचेही काही संस्कार होत जातात. यातच दुसरी भाषा ही भिन्न संस्कृती असलेल्या जेत्यांची असेल, तर तीच प्रारंभी राजव्यवहाराची, नंतर शिक्षणाची आणि मग व्यवहाराची भाषा बनते. या दृष्टीने पाहता, फारसी, हिंदी आणि इंग्रजी या भाषांचे अनेक संस्कार मराठीवर झालेले आहेत. काही संस्कार उर्दूद्वारा झालेले आहेत. इंग्रजीच्या बाबतीत तर 'वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा' अशीच अवस्था आहे. यातले सारेच संस्कार अनिष्ट स्वरूपाचे असतात, असे मात्र नाही. काही संस्कार आपल्या भाषेत भर घालणारेही असतात. जी शास्त्रे, ज्या ज्ञानशाखा आपल्या संस्कृतीत अस्तित्वात नाहीत किंवा नीट विकसित झालेल्या नाहीत, ज्या वस्तू आपल्याकडे निर्माण झालेल्या नाहीत, त्यांच्याशी संबंधित असे नवे शब्द आपल्या भाषेत आणि आपल्या ज्ञानभांडारात भरच घालीत असतात. ते शब्द घ्यावेतच. त्यांच्या संबंधात सोवळेपणा उपयोगाचा नाही. मात्र हे घडत असताना आपल्या भाषेतील काही योग्य शब्दांना हुसकून लावीत त्यांच्या जागा बळकावून बसणारे शब्दही असतात. अशा वेळी आपल्या शब्दांना पुन्हा त्यांच्या जागी प्रस्थापित करावे लागते. हे करायचे ते का, तर आपल्या भाषेतील ध्वनींचे एक पोत निर्माण झालेले असते, ते बिघडते म्हणून. ते कानामनांवर जे संस्कार करते, ते जपण्यासारखे धन आहे म्हणून.

आणि दुसरे म्हणजे माझ्या भाषेतील एखादा शब्द माझ्या भाषिक परंपरेत अनेकदा वापरलेला असतो आणि या कारणाने माझे त्याच्याशी आपुलकीचे नाते निर्माण झालेले असते. त्यामुळे त्याच्या अर्थाचा संस्कार माझ्या मनात खोलवर होतो. मी 'आई' असे म्हणतो त्यामुळे माझ्या कानावर विठाई, जनाई, बहिणाई, राजाई, गोणाई असे शब्द जेव्हा पडतात, तेव्हा माझ्या मनात 'आई' या शब्दातील

भावना नकळत त्या नावांशी आपुलकीचं नातं जोडते. मी वडिलांना 'बाबा' म्हणतो. यात वडिलांविषयी माझी जी भावना आहे ती ज्योतिबा, खंडोबा, विनोबा अशी आदरणीय नावं उच्चारताना माझ्या मनात पुसटपणे तरळून गेलेली असते. (मात्र उपरोधाने आपण म्हसोबा, दगडोबा म्हणतो, तेव्हाची गोष्ट वेगळी!) ज्ञानेश्वर 'बापरखुमादेवीवर' किंवा 'बापु' असं म्हणतात आणि मीही वडिलांना 'बापू' म्हणतो, तेव्हा या परंपरेतून एक सूक्ष्म नात्याचा धागा प्रतीत होतो. ही अशी स्थिती आमच्या समाजातल्या काही मुलांच्या तोंडी रुळू लागलेल्या 'डॅडी' आणि 'मॉम'ची नाही. याच कारणाने परक्या भाषेतील शब्दांना आपल्या भाषेच्या आधारे प्रतिशब्द निर्माण करता आले तर उत्तम. संस्कृत भाषेचा आधार असल्यामुळे असे अनेक शब्द आपल्यातील भाषारक्षकांनी निर्माण केलेले आहेतही. चित्रपट, दिग्दर्शक, छायाचित्रण, दिनांक, दैनिक, वृत्तपत्र, संसद, लोकसभा, राज्यसभा, महापौर ही त्यांची काही उदाहरणे. भाषेच्या संबंधात सतत जागरूक राहूनच हे काम करावे लागते. नाहीतर 'नमस्ते' म्हणायचे ते संस्कृतात, 'हॅलो, गुडमॉर्निंग' करायचे ते इंग्रजीत, 'झिंदाबाद'ची घोषणा अरबी भाषेत आणि 'भारतमाता की जय' हिंदीत आणि यावर 'हे असं चालायचंच' असा अभिप्राय व्यक्त करायचा तो मराठीत. अशा मिश्र भाषिक व्यवस्थेत आपणांस जगावे लागत आहे. यातून आपलं जाणणं, जाणवणं आणि ते भाषेतून व्यक्त करणं हे सगळं संमिश्र होईल तेव्हा आपल्या मन-बुद्धीची एकाग्रता आणि एकात्मता नष्ट होऊन भांबावलेल्या मानसिक स्थितीत समाजाला जगावं लागेल, असा धोका संभवतो.

यातून सूचित होणारा निष्कर्ष असा की, भाषा विकास पावते, हे जसे घडते, तसेच तिच्या ध्वनिरूपात आणि काही अर्थातही बदल होत जातात. बोलभाषांतून किंवा बाहेरील अन्य भाषांतूनही नवे नवे शब्द तिच्यात येतात, काही वाक्प्रयोगही येतात, तसेच उच्चारही येतात. मूळ भाषेपेक्षा दुसरीच भाषा किंवा दुसऱ्याच भाषा मूळ भाषेच्या व्यवहारक्षेत्रात सारख्या वापरल्या जाऊ लागल्या, तर मूळ भाषा व्यवहारातून हटतेच; नंतर तिच्या विकासाच्या दिशा खुंटून ती भाषा ऱ्हास पावू लागते आणि बोलणाऱ्या समाजाचा आणि तिचा संबंध क्षीण होत जातो. तिच्यातील वाङ्मयनिर्मितीही मंदावत जाते. विजेच्या दिव्याची कळ दाबल्यावर एकदम दिवे जातात, तशी ही अचानक उद्भवणारी अवस्था नसते. भाषा हळूहळू क्षीण होत बाजूला पडत जाते. परकीय शब्द जिरवता येतात, पण भाषा, व्यवहारातून हटत चालली की ही मोठ्या अरिष्टाचीच सूचना आहे असे समजावे. असे मराठीच्या

संबंधात होऊ शकते, अशी धास्ती आहे. माझ्या तोंडातून मराठी गेली तरी तिच्या जागी दुसरी कुठली तरी भाषा येईलच; पण माझी मातृभाषा मराठी माझ्या भावना-विचार व्यक्त करायला मला जशी व्यापकतेने व सूक्ष्मतेने साह्यभूत होते, अशी अवस्था नव्या भाषेच्या संबंधात मला प्राप्त व्हावयास अनेक शतके लागतील. पुन्हा मराठीच्या जागी येणाऱ्या त्या नव्या भाषेची शक्ती, समृद्धता काय असेल, हे सांगता येत नाही. म्हणजे मराठीकडून दुसऱ्या भाषेकडे सरकताना माझ्या नवसर्जनाच्या शक्ती खुरटलेल्या राहण्याची शक्यताच अधिक राहील. अशा मधल्या अवस्थेत कुठल्या साहित्याच्या आधारावर आम्ही जगणार आहोत? पिंजऱ्यात सापडलेलं एखादं श्वापद पिंजऱ्यातल्या पिंजऱ्यात अस्वस्थपणे फेऱ्या घालीत राहतं, तद्वत् माझं मन नव्या भाषेतील काही ठराविक शब्दांच्या पिंजऱ्यात काही शतके घोटाळत राहील. त्या मनाचे आजचे विहाराचे अफाट रान नाहीसे झालेले असेल, अशा वेळी 'शब्दांनो मागुते या' अशी आर्त आळवणी करायला तरी शब्द असतील की नाही, सांगता येत नाही. परिणामतः माझ्या गतिमान मन-बुद्धीचा विकास कुंठित होईल. हे सारं केवळ माझ्यापुरतंच घडणार नाही; तर ही अवस्था माझ्या साऱ्या समाजाचीच असेल. आणि इतकी शतके कष्ट करून ज्ञानदेव-नामदेवांपासून आतापर्यंत जे मौलिक विचार, जीवनानुभव, भावविश्व, सौंदर्यविश्व यांचे धन आम्ही या भाषेद्वारे साठवले त्याच्याशी असलेला आमचा संबंध हळूहळू तुटत जाईल. या प्रक्रियेतून मराठी मनच दृष्टिआड होत होत अखेरी पुसले जाईल. आम्ही आम्हांस पारखे होत जाऊ.

इतर भाषांतील शब्द आपल्या भाषेचा परिसर कसा व्यापतात, हे ध्यानात यावे म्हणून वानगीदाखल काही उदाहरणे येथे देत आहे :

'पोलीस, जमादार, हवालदार, फौजदार, मुन्सफ, मामलेदार, कलेक्टर, गव्हर्नर, अंमलदार' हे सारेजण मराठीत बाहेरून आलेले आहेत, त्यांच्याबरोबर 'लष्कर' तसेच 'तोफ, बंदूक, पिस्तुल, रायफल, समशेर' हेही आले. त्यांच्या 'कचेरीत सबनीस, फडणीस, चिटणीस, हजरनवीस' अशी हुशार मंडळी आहेत. मी 'अव्वल कारकून' आहे. कचेरीतील 'टेबल, मेज, दऊत, पेन, पेन्सिल, कागद, शाई, फाइल, हजेरी-बुक', सारे त्यांचे आहे. 'पगारासाठी रेव्हेन्यू-तिकिटावर सहीची निशाणी' अंगठा चालतो. यातला 'अंगठा' मात्र माझा आहे. कपड्यांपैकी 'शर्ट, पँट, कोट, जाकीट, टाय, ब्लाऊज, झंपर' हे सारे त्यांचेच. यांतला 'लंगोट' मात्र आपला. पायमोजातील 'मोजे' त्यांचे, 'पाय' आपले अशी स्थिती आहे.

गंजीफ्रॉकमधला 'फ्रॉक' त्यांनी माझ्या गळ्यात कधी गुंतवला हे कळले नाही. खाण्याच्या पदार्थात 'मटन, चिकन, बिर्याणी, ऑम्लेट, आईस्क्रीम' त्यांचे, पोट मात्र आपले स्वदेशी आहे. अशी एकंदर परिस्थिती असल्यामुळे आता पुढील वाक्य सहजपणे लिहिता येते : 'मामलेदार-कचेरीतील फडणिसाकडे पगाराच्या वसुलीसाठी तक्रार-अर्ज दाखल केला.' या वाक्यातील 'केला' हे क्रियापद सोडले तर एकही शब्द मराठी नाही. भाषेत 'बदल' होतात, भाषा 'बदल'ते, असे अनेकदा या विवेचनात म्हटले आहे; पण हा 'बदल' शब्दही मराठी नाही.

असे असले तरी आता हे शब्द आपले झाले आहेत. यापैकी काही शब्दांनी आपल्या मूळच्या शब्दांच्या जागा बळकावलेल्या असल्या, तर त्या जागा मूळच्या शब्दांना आपण परत मिळवून द्यावयास हव्यात; किंवा आपल्या भाषेच्या नादपोतात बसतील आणि आपल्या भाषेच्या नात्याचे असे नवे शब्द तयार करून योजायला हवेत. नपेक्षा हे परभाषेतून आलेले शब्द आपल्या भाषेत जिरवून टाकायला हवेत. तसे ते जिरलेले आहेतही.

अन्य भाषेचा संस्कार केवळ शब्दांपुरता मर्यादित नसतो. आपल्या उच्चारांवरही त्याचा परिणाम होतो. इंग्रजीतल्या फादर, फी, ऑफ्, वाइफमधल्या फच्या संस्कारामुळे ओठावर ओठ दाबून उच्चारावयाचा फुटाण्यातला, फडकेमधला, फटकळमधला 'फ' आता अनेकांच्या उच्चारातून गेलेला आहे. इंग्रजीत ऋचा उच्चार नाही आणि लिपीत लेखनाची सोय नाही, त्यामुळे तृषाचे त्रिशा, कृपाचे क्रिपा, कृष्णचे क्रिष्ण लिहावे लागते. त्या भाषेत आणि तिच्या लिपीत पोटफोड्या ष नाही, ण नाही, ङ् नाही, ञ नाही, ळ नाही, यामुळे मूळचे अनेक उच्चार बाधित होतात. हिंदीतही ळ हा वर्ण नसल्याने आपण टिळक म्हणायचे आणि त्यांनी 'तिलक', आपण कंटाळा म्हणायचे आणि त्यांनी 'कंटाला आया' म्हणायचे असे चालू राहते. हळूहळू आपल्या वाक्यरचनेवरही या संस्कारांचे काही परिणाम होतात. देऊन द्या, घेऊन घ्या, घेऊन राहिलोय अशी भाषिक वळणे येथे या संदर्भात आठवतात. रघुनाथपंडिताने आपल्या काव्यात नळराजाच्या साहाय्यास अरबी 'फौज' दिली आहे आणि 'केली विजार वर डौरहि मौन सेवी' असे म्हणत नळराजाला फारसी विजारही नेसवली आहे, याचेही येथे स्मरण होते.

अशा प्रकारे भाषा सूक्ष्म रीतीने बदलत असते. यात काही हितकर अशी भर असते; तर काही आक्रमणे असतात. आपली भाषा आपल्याकडूनही बदलत असते. म्हणूनच मोठ्या दक्षतेने तिची काळजी घ्यायची. शुद्धलेखनाचा आणि शुद्ध

उच्चारांचा आग्रह धरायचा, तो यासाठीच. आणि सातत्याने विचार करायचा, तो कोणते बदल इष्ट आणि कोणते अनिष्ट यांचा.

भाषेचे आणि आपले कोणते नाते आहे आणि तिच्यासाठी आपण लढा का देतो, प्राणपणाने का झुंजतो हे आता ध्यानात येईल. भाषा बदलते, भ्रष्ट होते, व्यवहारातून हटू लागते, मनातूनही पुसली जाऊ शकते, हे खरे असले तरी आणि या संबंधातल्या आपल्या धास्तीला अर्थ असला, तरी आता परिस्थिती पूर्वीच्याहून वेगळी आहे. आता आपले मराठीचे राज्य स्थापन झालेले आहे. त्याची सर्व सूत्रे आपल्या हाती आहेत. मराठी ही आता राजभाषा आहे. तिची काळजी आपण अनेक प्रकारे घेऊ शकतो. शाळा, महाविद्यालये यांतून आपल्या धोरणानुसार या भाषेचे शिक्षण देऊ शकतो. वृत्तपत्रे, मासिके, पुस्तके, आकाशवाणी, दूरदर्शन आदी अनेक माध्यमांच्या आधारे या भाषेचे लेखन आणि उच्चारण नीट होईल याची काळजी घेऊ शकतो. गीते, कविता, ग्रंथ यांच्याद्वारे तिची जपणूक आणि विकास होत राहीलच; मात्र हे सारे वेळीच सावध होऊन निकराने करायला हवे आहे. स्वातंत्र्यानंतर पूर्वीच्या तुलनेने बहुजनसमाजामध्ये शिक्षणाचा प्रसार अधिक झालेला आहे. आता त्यांच्याकडून मराठीचा विकास होणार आहे आणि मराठीच्या शिक्षणातून त्यांचाही विकास घडणार आहे. यात शासन, अनेक साहित्यसंस्था, मराठीतले लेखक, आणि समस्त मराठी जन, म्हणजे आपणच, या सर्वांची इच्छाशक्ती कामास लागली पाहिजे. मराठीच्या बाजूने हेही सांगावयास हवे आहे की, ती काही केवळ शहरी मंडळींची भाषा नाही. ती असंख्य खेड्यापाड्यांत पसरलेली आणि चांगली रुजलेली आहे. आठ-नऊ कोटी लोकांची ही भाषा आहे. अनेक संस्कार पचवण्याची तिची शक्ती सिद्ध झालेली आहे. तरीही असावध राहून चालणार नाही.

या भाषणाची समाप्ती मी पूर्वीच केव्हा तरी लिहिलेल्या एका कवितेतील काही ओळींनी करतो आहे :

भाषा जोडीत जाते असंख्यांची मने
तिच्या अर्थवाही शब्दांतून
कथांतून, गीतांतून, नाट्यांतून
देते माणसाला त्याच्या अस्तित्वाचे भान
भाषा जगवते मातीशी असलेले इमान
धरते डोळ्यांपुढे इतिहासाचे पानन्‌पान

फुलवीत ठेवते मनात आपल्या स्वत्वाची जाण
भाषेतूनच उसळते क्रांतीचे स्फुरण
होत राहते विचारांचे अभिसरण
भाषा जागृत ठेवते मनात तुम्ही घेतलेला वसा
सांगते तुम्हांला तुमचा चालत आलेला वारसा
एका चमत्कारयुगाच्या उंबरठ्यावर आपण उभे
दिशादिशांची दारे आता आपणांसाठी सताड उघडलेली
ना चंद्र लांब, ना मंगळ दूर
आपले आपल्याशीच जुळायला हवेत सूर
साऱ्या कला, सारी शास्त्रे, विचारीत आहेत -
'आम्ही तुम्हांस काय द्यावे?'
आता आपणच मनाशी ठरवायला हवे -
'आपल्याला काय हवे?'

(दि. ८,९, आणि १० फेब्रु.२००२ रोजी, मुंबई मराठी साहित्य संघ आणि महाराष्ट्र सेवा संघ, मुलुंड यांच्या संयुक्त विद्यमाने झालेल्या, मुंबई महानगर मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणावरून. - संपादक)

■

अफ्रिका हाऊस, एडनवाला रोड, माटुंगा, मुंबई - ४०० ०१९.

**भाषा वार्ता**

'ग्रंथाली' या वाचक चळवळीने या वर्षी १७ फेब्रुवारीला, अभिनव पद्धतीने वाचकदिन साजरा केला. ठाणे येथील ब्राह्मण विद्यालयात शालेय मुलांसाठी म्हणींच्या प्रश्नमंजूषेचा कार्यक्रम आयोजित केला होता. अशा प्रकारचे भाषिक खेळ मुलांची शब्दशक्ती आणि भाषाभिव्यक्ती वाढवण्यासाठी निश्चितच उपयुक्त ठरतील.



अनुक्रमणिका

# यम आणि नियमन

निर्मला कुलकर्णी

प्रत्येक कोसावर भाषा बदलते असं म्हणतात. या भाषा - बदलाची अनेक कारणं आहेत. वेगवेगळ्या संस्कृती एकत्र आल्या की शब्दांचं आदान-प्रदान होतं. काही वेळा शब्दाच्या अर्थच्छटा बदलतात. भाषेतील शब्द म्हणजे तरी काय? व्यवहारात वापरल्या जाणाऱ्या वस्तूंचा निर्देश. त्या वस्तूंना भाषिकांच्या मनात वेगवेगळे अर्थ प्राप्त झाले, संदर्भ बदलले की अर्थच्छटा बदलतात. उदा., वेदांमधील 'दस्यु' आणि अवेस्तामधील 'दत्यु' हे शब्द वस्तुतः एका विशिष्ट प्रांतात राहणारे लोक या अर्थी होते; पण आर्य-अनार्य संघर्षानंतर हा संदर्भ बदलला आणि दस्यु हा शब्द 'दास' नोकर या अर्थानं रूढ झाला. कधी कधी शब्दांचा अर्थविस्तार म्हणजेच संदर्भविस्तार होतो. अशा वेळी शब्दाच्या मूळ अर्थाखेरीज इतर अर्थही त्यात सामावले जातात. भाषकाच्या मनातली एखाद्या वस्तूची संकल्पना बदलली की त्यानुसार तो शब्द विविध अर्थच्छटा दाखवतो. हे वेदांतील आणि पुराणांतील यमदेवतेच्या संदर्भात स्पष्ट करता येईल.

ऋग्वेदातील यमाची प्रतिमा आणि पुराणांमधील त्याचं चित्र यात महदंतर आहे. ऋग्वेदातला 'यम' हा पितरांचा प्रेमळ राजा. मृत्यूला सर्वप्रथम त्यानं स्वीकारलं म्हणून अनुगामी लोकांचा तो राजा बनला. पुराणवाङ्मय आणि इतिहासादी काव्यं यात दिसून येणाऱ्या त्याच्या भयंकर स्वरूपाचा लवलेशसुद्धा त्याच्या ऋग्वेदातल्या वर्णनात नाही. इतकंच नव्हे, तर नियमन करणारा धर्मराज ही त्याची पुराणातली प्रतिमादेखील ऋग्वेदात आढळत नाही. ऋग्वेदातले लोक धाकात राहतात, ते वरुणाच्या - यमाच्या नव्हे. असा हा प्रभावी पण प्रेमळ नेता पुराणकाळी मात्र भयंकर मृत्युदेवता बनला. न्यायनिष्ठुर बनून लोकांना शासन करू लागला. त्याच्या स्वरूपातल्या या बदलांमागे कोणती कारणं असावीत? त्याची 'नियामक', 'नियंत्रक' प्रतिमा निर्माण करण्यामागे 'यम्' या धातूचा सहभाग असू शकेल का? यम ही देवता आणि यम् हा नियंत्रणार्थी धातू यांचा अन्योन्यसंबंध महाकाव्यात आणि पुराणांमध्ये अनेकदा दिसून येतो. उदा.,

१) नियन्ता हे यमाचं विशेषण 'नि + यम्' या धातूपासूनच बनलं आहे.

अयं वैवस्वतो धर्मो नियन्ता सर्वदेहिनाम् ।
धर्माधर्मव्यवस्थायां स्थापितो लोकपालकः ॥

असं वर्णन भागवतपुराणात येतं; तर मत्स्यपुराण

"त्वमेव जगतां नाथ प्रजासंयमनो यमः"

असं त्याचं नियामक स्वरूप स्पष्ट करतं.

२) यमाच्या नगरीचं नावदेखील 'संयमनी' असं आहे.

३) मत्स्यपुराणामध्ये त्याचा आणि यम या धातूचा संबंध अधिक स्पष्ट केला आहे.

कर्मणामनुरूपेण यस्मादामयसे प्रभो ।
तस्माद्वै प्रोच्यसे देव यम इत्येव नामतः ॥२१२.२१

४) सायणाचार्यादी भाष्यकारही 'यम' या शब्दाची व्युत्पत्ती 'यमयति नियमयति पापानुसारेण प्राणिनो निगृह्णाति' अशी देतात. वेदोत्तर वाङ्मयात दिसून येणारा हा 'यम्' धातू आणि 'यम' देवता यांचा संबंध अगदी सहज वाटत असला, तरी वेदवाङ्मयातली, विशेषतः ऋग्वेदातली परिस्थिती मात्र भिन्न आहे. कारण यम शब्दाच्या या दोन्ही अर्थच्छटा तिथं स्वराघातांनी बद्ध केल्या आहेत. 'यम' या देवतावाचक शब्दाचा अर्थ 'जुळा' आणि 'यम' या नियंत्रणवाचक शब्दाचा अर्थ अर्थातच नियामक. या दोहोंचे स्वराघात भिन्न आहेत. त्यामुळे अर्थाची अदलाबदल करणं अशास्त्रीय ठरतं. हा मुद्दा मॅक्डोनल, डॉ. रा.ना. दांडेकर इ. अग्रणींनी मांडला आहे. इथं मी दांडेकरांचे या बाबतीतलं मत उद्धृत करते.

The conception of Yama's role as fearful and restraining God of death must have been facilitated only by the popular derivation of the word **Yama** from the root yam to restrain, which though normally possible is not acceptable in this case on account of the difficulties of Vedic accentuation which it would create. But it is this aspect of Yama's personality which has been preserved prominently in the later Hindu mythology."

स्वराघातांनी बद्ध असतानादेखील 'यम' या शब्दाचा अर्थ विस्तार नेमका कधी झाला? स्वरांचं नियंत्रण झुगारून देऊन मूलतः, 'जुळा' हा अर्थ दाखवणारी यमदेवता 'नियामक' हा अर्थ कधीपासून दाखवू लागली? या प्रश्नांची उत्तरं

शोधण्याचा प्रयत्न प्रस्तुत ठिकाणी केला आहे. वेदवाङ्मयातील 'यम' या शब्दाचे सर्व संदर्भ पडताळून निष्कर्ष दिले आहेत.

ऋग्वेदातील 'यम' शब्द - ऋग्वेदामध्ये 'यम' या शब्दाच्या पुढील अर्थच्छटा आढळतात.

१) प्रथम स्वर उदात्त असलेला 'यंम' हा शब्द लगाम, रथ काबूत ठेवणारा सारथी आणि दाता या अर्थी वापरला आहे. त्यांपैकी लगाम आणि सारथी या अर्थाचा 'यम' हा शब्द नियंत्रणवाचक 'यम्' या धातूपासून उत्पन्न झाला आहे; तर 'दाता' या अर्थाचा शब्द यम्-यच्छ् या धातूपासून बनला आहे. 'नसोर्यमः' (ऋ.५.६१.२) या वाक्यात घोड्यांचं वर्णन आहे. 'घोड्यांच्या नाकपुड्यांमध्ये लगाम आहे.' 'अग्निरथांना यंमम्' या वाक्यात अग्नी रथाचा सारथी आहे असं वर्णन आहे, तर 'स्तुहि इन्द्रं राजिनं यमम्' इथं 'त्या सामर्थ्यशाली आणि उदार इंद्राची तू स्तुती कर.' अशी विनंती केली आहे. हा झाला 'यंम' या प्रथम स्वराघाती शब्दाचा प्रपंच.

ऋग्वेदातला द्वितीय स्वराघाती 'यमं' शब्द हा जुळा या अर्थी प्रचारात आहे. यम आणि यमी ही जुळी भावंडं ऋग्वेदात अधिक प्रचलित आहेत. यमाची ऋग्वेदातली ओळख ही यमीचा जुळा भाऊ अशीच जास्त प्रमाणात येते. पुराणकालात मात्र ही ओळख अधिक पुसट झाली आहे.

अशाप्रकारे ऋग्वेदात या दोन शब्दांच्या अर्थच्छटा भिन्न स्वराघातांनी दाखवल्या आहेत. यम हा देवतावाचक शब्द 'पड्वीश' म्हणजे 'बेडी' या त्याच्या शास्त्राचा उल्लेख वगळता त्याचं नियंत्रक स्वरूप स्पष्ट करत नाही. सायण मात्र स्वराघातांचा विचार न करता 'यम' या देवतावाचक शब्दाचा अर्थ 'नियामक' असा देतात.

अथर्ववेदातलं वर्णनही ऋग्वेदाहून फारसं भिन्न नाही, पण इथं यमाला साक्षात मृत्यू असं संबोधून थोडासा पुढचा टप्पा गाठला आहे. 'अघमार' हे त्याचं विशेषण त्याच्या पुराणकालीन न्यायनिष्ठुर प्रतिमेची आठवण करून देतं; परंतु, इथंही यम या शब्दाचं स्वरद्वैविध्यानुसार अर्थद्वैविध्य टिकवलेलं दिसतं. कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय संहितेमध्ये 'यम' हा प्रथम स्वराघाती शब्दच नाही, परंतु तिथं 'यमन' हा त्याच धातूपासून बनलेला शब्द घोड्याचं विशेषण म्हणून आला आहे. त्याचा अर्थ नियंत्रणाचं साधन असा होतो.

द्वितीय अक्षरावर स्वराघात दाखवणारा 'यमं' शब्द ऋग्वेदाप्रमाणेच 'जुळा'

हा अर्थ दाखवण्यासाठी आणि पर्यायानं यमदेवतेचा निर्देश करण्यासाठी आहे. 'तस्माद्यमौ जायेते' (७.११) इथं जुळा हा अर्थ व्यक्त होतो. यमं या देवतावाचक शब्दाची मनोरंजक व्युत्पत्ती तै. संहितेतील एका पुराकथेत येते. आपल्याला सार्वभौमत्व मिळावं म्हणून यमानं सगळ्या देवतांचं वीर्य आणि इंद्रियं देहापासून तोडली आणि मग तो सार्वभौम सम्राट बनला.

"स यमो देवानामिन्द्रियं वीर्यमयुवत् तद्यमस्य यमत्वम् ।
अयुवत् देवेभ्यः पृथक्कृतवान् ।
अतः यवनामकोऽयं वर्णव्यत्ययेन यमः सम्पन्नः ।"

दुसऱ्या एका परिच्छेदामध्ये 'अधरा' या दिशेचं नाव वशिनी असं दिलं आहे. सायणाचार्यांच्या भाष्यानुसार यम हा या दिशेचा अधिपती आहे.

या दोन्ही परिच्छेदांवरून यमाला आपण नियामक देव म्हणू शकत नाही. परंतु त्याची संहारक शक्ती, सार्वभौमत्वाची अभिलाषा यावरून त्याचा प्रवास मात्र पुराणकालीन स्वरूपाच्या दिशेनं सुरू असल्याचं जाणवतं.

मैत्रायणी, काठक, काण्व आणि माध्यंदिन या यजुर्वेदाच्या संहिता यमाचं उग्र आणि भयंकर स्वरूप चित्रित करतात; परंतु त्याचं नियामक स्वरूप मात्र दाखवत नाहीत. 'मृत्युर्वैयमः' 'मृत्युर्वैवरुणः' अशा रीतीनं, दोघांचही 'मृत्यू' म्हणून वर्णन येतं.

ब्राह्मणग्रंथांपैकी शतपथब्राह्मण हा ग्रंथ मात्र या संदर्भात फार महत्त्वाचा ठरतो. शब्दस्वरूप आणि संकल्पना या दोन्ही दृष्टीनं यमाचं 'नियामक देवता' असं चित्रण सर्वप्रथम केलंय, ते शतपथ ब्राह्मणामध्ये. यम या प्रथम स्वराघाती शब्दाचा संदर्भविस्तार याच वैदिक ग्रंथात सर्वप्रथम केला आहे. नियामक, नियंत्रक अशा अर्थानं सर्वत्र वापरला गेलेला हा शब्द यमदेवतेलाही उद्देशून प्रयुक्त केला आहे. यम या देवतेचं वर्णन करण्यासाठी प्रथम स्वराघाती यम शब्द आणि द्वितीयस्वराघाती यम शब्द असे दोन्ही शब्द वापरले आहेत. 'यमो वैवस्वतो राजा इत्याह' या परिच्छेदातला यम शब्द प्रथम स्वराघाती आहे; तर इतर बऱ्याच परिच्छेदांमध्ये यमदेवतेचा निर्देश करण्यासाठी द्वितीय स्वराघाती शब्द वापरला आहे. 'क्षत्रं यमो विशा पितृभिः अदाद्यमो आवसानं पृथिव्याः' या परिच्छेदात तसं दिसतं.

अशाप्रकारे, इतर सर्व संहितांमधून पाळलेलं स्वरनियंत्रण शतपथ ब्राह्मणानं यम शब्दाच्या बाबतीत तरी झुगारून दिलं आहे. इतकंच नव्हे, तर यम या धातूचं

आणि यम या देवतावाची शब्दाचं साहचर्यदेखील काही उताऱ्यांमध्ये आढळतं. उदा., "अग्निर्वैयम:, इयं यमी आभ्यां हि इदं सर्वं यतम् ॥" या उताऱ्यामध्ये 'यम आणि यमी यांनी हे सर्व जग नियंत्रित केलं आहे." असं सांगितलं आहे. दुसऱ्या एका उताऱ्यामध्ये तर हा संबंध अधिकच स्पष्टपणे सांगितला आहे. "इत्येष वै यमो य एष तपति, एष हीदं सर्वं यमयति । एतेनेदं सर्वं यतम् ।"

यम हा देवतावाची शब्द आणि यम हा नियंत्रणार्थी धातू यांची सांगड घालून शतपथ ब्राह्मण थांबत नाही; तर यम् आणि ईश् धातू यांचाही संबंध हा ग्रंथ दाखवतो. 'यमो ह वा अस्य अवसानस्येष्टे ।' या प्रदेशाचा यम हा ईश आहे, स्वामी आहे हा या वाक्याचा भावार्थ.

एकंदरीत, वेदोत्तर साहित्य आणि सायणादी भाष्यकार या सर्वांना संदर्भविस्तार करायची प्रेरणा मिळाली, ती शतपथ ब्राह्मणातून, असं म्हटलं तर वावगं ठरणार नाही.

एकंदरीत,

१. सर्व संहितांमध्ये 'यम' हा यमीचा जुळा भाऊ आणि पितरांचा प्रेमळ राजा म्हणून ओळखला जातो.

२. ऋग्वेदातील त्याची उग्र मूर्ती फक्त एकाच ऋचेत आढळणाऱ्या पड्बीश (बेड्या) या उल्लेखातून सूचित केली आहे.

३. अथर्ववेदातील 'अघमार' हे विशेषण वापरून त्याच्या नियंत्रक मूर्तीचं स्वरूप थोडंसं अधिक स्पष्ट केलं आहे.

४. तैत्तिरीयसंहिता त्याची सार्वभौमत्वाची अभिलाषा चित्रित करते आणि 'वशिनी' या दिशेचा त्याला अधिपती बनवते. अशाप्रकारे, तो नियामक प्रतिमेच्या थोडासा जवळ आला आहे.

मात्र यापैकी कोणताही ग्रंथ 'यम्' हा नियंत्रणार्थी धातू आणि 'यम' हा जुळा या अर्थीचा शब्द यांची गल्लत करत नाही. कारण नियामक देवता म्हणून यमाला स्पष्टपणे मान्यता मिळालेली नाही. ती मान्यता मिळाल्याबरोबर स्वराचं नियंत्रण गळून पडलं आणि यम या शब्दाचा संदर्भविस्तार झाला.

केवळ ध्वनिसाम्यामुळंच हा संदर्भविस्तार झाला, असं नाही.

पहिला मर्त्य आणि पितरांचं राजेपद यामुळं मृत्यूशी संबंध येता येता 'यम' स्वतःच मृत्यू बनला. साहजिकच, त्याचं जुळं, प्रेमळ स्वरूप जाऊन तो भयंकर आणि उग्र बनला. त्याचं राजेपददेखील त्याच्या या नियंत्रक स्वरूपाला कारण

ठरलं. कारण, नियंत्रण हा राजाचा गुण आहे. त्याच्या पुराणकालीन न्यायनिष्ठुर प्रतिमेचं प्रमुख कारण म्हणजे कर्म आणि कर्मफळ यांचा मृत्यूनंतरच्या जीवनाशी संबंध. ऋग्वेदामध्ये पापाचं फळ त्याच जन्मात वरुण देत असे, परंतु ब्राह्मण-काळात कर्मसंकल्पनेचा हळूहळू विकास झाला. व्रतपती वरुणाचं न्यायासन धर्मराज यमानं बळकावलं. हीच शतपथ ब्राह्मणातली 'यम' या शब्दाच्या संदर्भविस्ताराची पार्श्वभूमी आहे.

■

**संस्कृत प्रगत अध्ययन केन्द्र, पुणे - ४११ ००७.**

## गिळेल तो पचवील काय?

माझी मुलगी दीपा आणि भाची माधवी जेवणाच्या पानांची मांडामांड करत होत्या. त्यांच्या गप्पाही सुरू होत्या. मी मधूनमधून त्या दोघींना सूचना करत होते. माझ्या सूचना संपेनात आणि गप्पांमध्ये व्यत्यय येऊ लागला, त्यामुळे दीपा वैतागून माधवीला म्हणाली, "ही मोठी माणसं सारख्या सूचना करत राहतात. मला खूप राग येतो. तुला नाही येत?" माधवी म्हणाली, "येतो ना!" "मग?" दीपानं विचारलं. माधवीनं सांगितलं, "मी तो गिळून टाकते."

माधवीची छोटी मुलगी सानिका (वय वर्षे ६-७) हे सगळं शांतपणे ऐकत होती. तिच्या आईनं 'गिळून टाकते' म्हणताच तिने अचानक विचारलं, "पण तो पचतो का?"

या तिच्या प्रश्नावर आम्ही सगळेजण हसत सुटलो. सानिका बुचकळ्यात पडली, कारण आईनं नव्हतं का सांगितलं 'नीट चावून खा, घाईनं गिळू नको, अशानं अन्न पचत नाही' म्हणून?

■

**सुधा क्षीरे, पुणे (पालकनीती फेब्रुवारी २००२. थोड्या संक्षेपाने)**

# मराठीचे राजकारण का फसते?

**सुहास पळशीकर**

समाजातील वर्चस्वसंबंधांभोवती संमतीची भिंत उभी करण्यात भाषेचा हातभार लागत असतो. त्याबरोबरच या भिंती मोडण्यासाठीही भाषा हे एक महत्त्वाचे साधन असते. भाषेच्या निमित्ताने किंवा भाषेच्या भोवती जे राजकारण होते, ते या वर्चस्व आणि धुरीणत्वाच्या चौकटीत पाहायला हवे. मात्र प्रत्यक्षात घडणारे भाषेचे राजकारण प्रतीके, संवेदना, भावनिकता यांच्या गदारोळात घडून येत असते. त्याला तात्कालिक, स्थानिक इ. संदर्भ असतात. त्यामुळे भाषेच्या राजकारणाला भाषिक अस्मिता आणि प्रादेशिक अस्मितांच्या राजकारणाचे स्वरूप येऊन मूळ संदर्भदृष्टिआड होऊ शकतात किंवा त्यांचा विपर्यास होऊ शकतो. या पार्श्वभूमीवर मराठी भाषेचे राजकारण कसे घडते - आणि कसे घडत नाही - याची चर्चा प्रस्तुत निबंधात केली आहे. ह्या निबंधात मुख्यतः सध्याच्या - गेल्या काही - वर्षांमधील मराठीविषयक राजकारणाची उदाहरणे घेतली असली, तरी त्यांना असलेल्या दोन व्यापक आणि राष्ट्रीय पातळीवरील संदर्भांचा उल्लेख सुरुवातीलाच करायला हवा.

**भारताचे भाषा-धोरण**

भारत हा बहुभाषिक देश असल्यामुळे आपले भाषाविषयक धोरण नेहमीच वादग्रस्त, गुंतागुंतीचे, गोंधळाचे राहिले आहे. त्यातच वासाहतिक पार्श्वभूमी आणि वसाहतवाद-विरोधातील लढ्याच्या भावनिक गरजा यांच्यामुळे इंग्रजी ही वसाहतवादाचे प्रतीक मानून तिला एक राष्ट्रीय पर्याय शोधण्याचे प्रयत्न स्वातंत्र्य-चळवळी दरम्यान होत राहिले. घटना समितीत अधिकृत भाषेचा प्रश्न सर्वाधिक वादग्रस्त ठरला, असे ग्रॅनव्हिल ऑस्टिन यांनी नोंदविले आहे. (ऑस्टिन पृ.२७४-३०७). भाषा-प्रश्न हा भावनिक तर होताच; पण त्याला दोन सामाजिक परिमाणे होती. एक तर भारतीय राज्यसंस्थेच्या विस्तृत प्रशासकीय यंत्रणेवर कोणाचे नियंत्रण राहणार, हे अधिकृत भाषेनुसार ठरणार होते. जर हिंदी हीच एकमेव अधिकृत भाषा ठरली, तर दक्षिण भारतीयांचे प्रशासन यंत्रणेत काहीच नियंत्रण राहले नसते. याउलट इंग्रजी ही अधिकृत भाषा राहिल्यास शिक्षणप्रसार फारसा

न झालेल्या प्रदेशांच्या संधी हुकणार होत्या. दुसरे सामाजिक परिणाम हे धर्माचे होते / आहे. उर्दू आणि उर्दूमिश्रित हिंदी यांचे मुस्लिमांशी समीकरण बसविण्यात आले आहे. फाळणीचा निर्णय होण्यापूर्वी उच्चभ्रू मुस्लिमांना उर्दू आणि उर्दूमिश्रित हिंदी अधिकृत भाषा होण्यात रस होता. फाळणीनंतर बरेच खानदानी मुसलमान - विशेषतः उत्तरेतील - पाकिस्तानात गेले, पण हिंदूंच्या मनातील धार्मिक समीकरण कायम राहिल्यामुळे 'शुद्ध' हिंदीचा आग्रह हा हिंदू धार्मिक अस्मितेशी संलग्न राहिला. घटना समितीतील निकराच्या वादानंतर झालेला अजागळ[१] समझोता आणि पंधरा वर्षांनंतर म्हणजे १९६५मध्ये करण्यात आलेला भाषाविषयक निर्णय[२] यातून इंग्रजीचे महत्त्व कायम ठेवून प्रादेशिक भारतीय भाषांना उठाव मिळाला कारण राज्यांचा कारभार त्यांच्या त्यांच्या भाषेत चालणे मान्य झाले. त्यामुळे राज्यपातळीवरील प्रशासकीय नोकऱ्या त्या त्या राज्याच्या भाषकांच्या नियंत्रणाखाली आल्या. 'त्रिभाषा' सूत्रामुळे भाषा-भाषांमधील दरी कमी झाली नाही. कारण, उत्तरेत तिसरी भाषा म्हणून सहसा संस्कृत, उर्दू किंवा एखादी विभागीय भाषा शिकवली गेली, तर दक्षिणेत या सूत्राची अंमलबजावणी अंगचोरपणे झाली (ब्रास १४३). त्यामुळे भाषाविषयक धोरणातून मुख्यतः प्रादेशिक भाषाभिमान निर्माण व्हायला मदत झाली. त्याच्या जोडीने उत्तरेत आणि लोहियांमुळे समाजवादी वर्तुळात 'अंग्रेजी हटाओ' ही भावनिक चळवळ काही प्रमाणात चालू राहिली.

**भाषावार राज्य**

भाषेच्या राजकारणाला असलेला दुसरा व्यापक संदर्भ आहे, तो भाषावार प्रांतरचनेचा. केवळ प्रशासकीय सोईसाठी नव्हे; तर लोकशाही आणि बहुविधता ही तत्त्वे सकसपणे अमलात आणण्यासाठी भाषावार प्रांतरचना असावी, अशी भूमिका होती. स्वातंत्र्योत्तर काळात ती थोडी डळमळीत राहिली, पण टप्याटप्याने भाषावार राज्यनर्मिती झाली. ती करताना एक निकष असा होता, की फक्त वस्तुनिष्ठ पातळीवर समान भाषा असणे पुरेसे नाही, तर त्या भाषिक समूहात आत्मभान आणि त्यावर आधारित सामूहिक चळवळ आणि राज्यनिर्मितीला पाठिंबा असावा (ब्रास १४२-१४३). लोकशाही व्यवहार म्हणून हा निकष उचित व आकर्षक वाटला, तरी त्याला अडचणीची बाजू होती. ती अशी की, सामूहिक आत्मभान साकारताना व साकारण्यासाठी भावनिक आवाहन, ऐतिहासिक ऐक्याच्या स्मृती जागवणे, पर-भाषकांपासूनचे वेगळेपण (आणि श्रेष्ठत्व) अधोरेखित करणे, त्यांना 'धोका' मानणे, प्रतिस्पर्धी मानणे इ. राष्ट्रसदृश

वैशिष्ट्ये राज्यनिर्मितीच्या चळवळीत येत गेली. महाराष्ट्रात आपल्याला 'फक्त महाराष्ट्राला तेवढा इतिहास आहे; बाकीच्यांना केवळ भूगोल आहे' किंवा 'महाराष्ट्रा विना राष्ट्रगाडा न चाले' अशा उक्तींचा परिचय आहेच. ह्या भावनिक भरातच (इथे शिवाजी कोण, ते वादग्रस्त असले तरी!) प्रतिपक्षाला 'औरंगजेब' आणि सामील न होणाऱ्याला 'सूर्याजी पिसाळ' वगैरे संबोधने बहाल करणारी भाषिक शिवशाही महाराष्ट्राच्या चळवळीतच अवतरली होती. भाषिक अभिमानातून प्रदेशाभिमान जसा निर्माण झाला, तसेच भाषावार राज्यनिर्मितीमुळे राज्यांतर्गत भाषेच्या राजकारणाचा एक आकृतिबंध तयार झाला. 'पर'भाषांच्या आक्रमणाबद्दल अतिसाधव पवित्रा, 'स्व'-भाषा 'समृद्ध' करण्यासाठीच्या सरकारी यंत्रणांची मागणी आणि स्वभाषिकांना नोकऱ्यांत प्राधान्य मिळावे यासाठीच्या मागण्या, यातून भाषावार राज्यनिर्मितीनंतरच भाषेचे राजकारण अनेक राज्यांमध्ये साकार झाले. तमिळनाडूत त्याला 'हिंदी - विरोधाचे' परिमाण मिळाले, पंजाबात त्याची शीख धर्माशी सरमिसळ झाली; तर आसाममधील बंगालीविरोध हा 'घुसखोरी' विरुद्धच्या उग्र आंदोलनाच्या रूपाने चिघळला. गोव्यात त्या निमित्ताने 'माय' कोण आणि 'मावशी' कोण, असा वाद होऊन अखेरीस अधिकृत भाषांच्या यादीत 'कोकणी'चा समावेश केला गेला[३] व ती गोव्याची राज्यभाषा बनली.

**इंग्रजीविषयीचा वाद**

या दोन व्यापक संदर्भांच्या चौकटीत महाराष्ट्रातील भाषेचे राजकारण घडले - घडत आले. राष्ट्रवाद आणि स्वभाषांच्या विकासाचा ध्यास यांच्या प्रभावातून १९४८ साली इंग्रजी भाषा सातव्या इयत्तेअखेरपर्यंत हद्दपार केली गेली. त्यावर उपाय म्हणून निवडक उच्चभ्रू मंडळींनी इंग्रजी माध्यमाच्या शाळांचा रस्ता धरला. पुढे यथावकाश (१९६८ पासून) इंग्रजी भाषाविषय पाचवीपासून सुरू करण्यात आला. पन्नाशीच्या दशकात राज्यनिर्मितीची चळवळ झाली. ती तिहेरी होती. एका बाजूला वाद केंद्राशी होता. दुसरीकडे मुंबईच्या संदर्भात गुजराथी समाजाशी वाद होता, पण या दोहोंखेरीज संयुक्त महाराष्ट्र चळवळीतला तिसरा पदर अंतर्गत ऐक्याचा होता. विदर्भातील मराठी भाषक काही मराठीच्या मुद्यावर एकत्र यायला तयार नव्हते. त्यासाठी बरीच कसरत करावी लागली, हे सुपरिचित आहे आणि तरीही प्रश्न सुटलेला नाही, हे अलीकडच्या काळातील स्वतंत्र विदर्भवादी आंदोलनाने उघड झाले आहे.

महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर रीतसर मराठी भाषेच्या विकासासाठीचे विविध प्रकल्प शासनाने सुरू केले, पण आठवीपर्यंत इंग्रजी न शिकविण्याच्या धोरणामुळे असेल बहुधा, उद्योग, व्यापारी आस्थापने, सरकारी खाती इ. ठिकाणी बिगर-मराठी भाषकांचे अस्तित्व डोळ्यांत खुपू लागले. स्वाभाविकच मुळात बहुभाषक असणाऱ्या मुंबईत हा गुंता चटकन जाणवू लागला आणि त्यावर सोपे उपाय शोधणारी कनिष्ठ मध्यमवर्गाची सेना निर्माण होऊन 'भूमिपुत्रां'चे राजकारण मुंबईत साकारते झाले. अशा रीतीने मराठी भाषकांचे राज्य झाले, तरी भाषेचे राजकारण नवनवी वळणे घेत राहिले. खेर मंत्रिमंडळाने केलेल्या हद्दपारीला अर्धशतक उलटून गेल्यावर १९९९च्या अखेरीस महाराष्ट्र सरकारने दुसऱ्या टोकाचा निर्णय घेतला व पाहिलीपासून राज्यात सर्वत्र इंग्रजी शिकविण्याचा निर्णय जाहीर केला. पुढे सहाएक महिने या विषयावर वादंग चालू राहिले. सरकारतर्फे या वादस्पर्धेतील एक स्पर्धक म्हणून खुद्द शालेय शिक्षणमंत्री उतरले. विरुद्ध पक्षातर्फे तज्ज्ञ, काही साहित्यसंमेलनाध्यक्ष (ह्या दोन्ही वर्गवारी परस्पर व्यावर्जक नाहीत!) इ. मंडळींनी भाग घेतला. सरकार व शिक्षणमंत्र्यांची भूमिका अशी राहिली की जगात इंग्रजीला पर्याय नाही. त्यातच आता संगणकादी साधनांनी युक्त अशा ज्ञानविश्वात विद्यार्थ्यांना इंग्रजी यायलाच हवे. आपल्या राज्यातील सर्व विद्यार्थ्यांमध्ये ही भाषिक कुवत आणि तज्जन्य आत्मविश्वास निर्माण करण्यासाठी पहिलीपासून सर्वांना इंग्रजी शिकवायला हवे. त्याखेरीज, आर्थिक उदारीकरण आणि जागतिकीकरण यांच्या संदर्भात इंग्रजी भाषेचे महत्त्वही मांडण्यात आले (मोरे पृ.२७). त्याचबरोबर 'म. फुले यांनीही इंग्रजी शिकायला सांगितले' असल्याचा दाखला दिला गेला (मोरे १०,११). 'शासनाचे शिक्षण धोरण बहुजनाभिमुख' असल्याचे प्रतिपादन करून 'पहिलीपासून इंग्रजी' हे बहुजन समाजाच्या हितासाठी असल्याचे सांगितले गेले (दै.पुढारी ५ व ९ डिसें.९९). या धोरणाला अनेक वृत्तपत्रांनीही पाठिंबा दिला. 'महाराष्ट्र टाइम्स' व 'लोकसत्ता' यांनी वरील युक्तिवादातील 'व्यावहारिकते'च्या मुद्यावर अनुक्रमे 'इंग्लिश हवेच' (म.टा.३डिसें. ९९) आणि 'चांगला निर्णय' (लोकसत्ता २ डिसें.९९) अशी समर्थनपर संपादकीये लिहिली. 'सकाळ'नेही धोरणाचे स्वागत केले, पण ते 'इंग्रजीची गरज की गुलामी' असे संदिग्ध शीर्षकचे संपादकीय लिहून (१ डिसें. ९९). या सरकारी युक्तिवादाच्या काहीसे पुढे जात सदा डुंबरे यांनी मराठीपणा टिकविण्यावर भर देत इंग्रजी भाषा हे व्यावहारिक साधन म्हणून स्वीकारण्याची

गरज अधोरेखित केली (साप्ताहिक सकाळ १२-२-२०००). रामकृष्ण मोरे यांच्या युक्तिवादाचा दुसरा भाग होता बहुजन समाजाच्या हिताविषयीचा. मोठ्या शुल्कांवर चालणाऱ्या १९६१ इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून सुमारे पावणेसहा लाख विद्यार्थी दरवर्षी शिक्षण घेतात, त्यामुळे विविध सामाजिक विषमतांच्या पार्श्वभूमीवर हे विद्यार्थी म्हणजे शहरी, पांढरपेशा उच्चजातीय मध्यमवर्गीय पालकांची मुले असणार, असा या युक्तिवादामधील गृहीत भाग आहे. तो तर्क पुढे नेत मीना चंदावरकर यांनी 'शिक्षणात ब्राह्मण्यवाद जोपासू नका' असा थेट हल्ला चढवला (म.टा.१८ फेब्रु. २०००). त्यांच्यापेक्षा बऱ्याच सौम्य भूमिकेतून पण सर्वसामान्य विद्यार्थ्यांना इंग्रजी शिक्षणाची संधी उपलब्ध करून द्यावी हे सांगणाराच - विलास साळुंके यांचा 'पहिलीपासून इंग्रजी : का आणि कसे?' हा लेखही 'म.टा.'मध्ये प्रसिद्ध झाला. (म.टा.रविवार पुरवणी, २० फेब्रु.२०००). 'इंग्रजी - वाद्यां'च्या बाजूने बहुधा सर्वाधिक परखड पण मर्मावर बोट ठेवणारा लेख विजय तापस यांचा होता. (रामकृष्ण मोरेंचा मोरावळा, लोकसत्ता, २२ डिसें. १९९९). इंग्रजी न येणारे विद्यार्थी न्यूनगंडाची शिकार होतात, हे नोंदवून शिक्षणक्षेत्रातील वर्ग आणि संस्कृति-संघर्ष दूर करणारा निर्णय, असे त्यांनी या निर्णयाचे स्वागत तर केलेच; पण या निर्णयाचे राजकारण एका वाक्यात स्पष्ट केले : 'या निर्णयाचं खरंखुरं महत्त्व हे आहे की त्यामुळे सर्व स्तरांतल्या विद्यार्थ्यांचं एका टप्प्यापर्यंत समानीकरण होणार आहे.' वर्तमानपत्रांमध्ये आलेली वाचकांची पत्रे पाहता असे दिसते की, पहिलीपासून इंग्रजी शिकविण्याच्या धोरणाला बराच पाठिंबा होता. लहान शहरे आणि ग्रामीण भाग येथील वाचकांनी या धोरणाचा व्यावहारिक कारणासाठी तर पुरस्कार केलाच; पण त्यांच्या पत्रांमध्ये काही शहरी लोकच इंग्रजी शिकून पुढे जातात, याचा सल स्पष्टपणे दिसतो आणि पहिलीपासून इंग्रजी शिकल्यामुळे ही तफावत दूर होईल, असा (कदाचित भाबडा) आशावाद दिसतो. शिवाय त्यांच्या परिसरात मराठीची काही फार गळचेपी झाल्याचं त्यांना दिसत नसते. त्यामुळेही त्यांना हा प्रश्न 'मराठी की इंग्रजी' अशा द्वैताच्या स्वरूपात जाणवला नसावा. इथे अर्थातच मराठी एक आधुनिक ज्ञानभाषा म्हणून विकसित होणे आणि ती दैनंदिन लोकव्यवहाराची भाषा असणे, हा फरक शिल्लक राहतोच. वर्तमानपत्रांचा वाचक दुसऱ्या अर्थाने पाहून मराठीच्या अस्तित्वाचे मूल्यमापन करीत असणार.

म्हणूनच की काय, इंग्रजी पहिलीपासून शिकविण्याच्या निर्णयाला जो विरोध

झाला, तो मोठ्या शहरामधील बुद्धिवंत, बुद्धिजीवी, शिक्षणतज्ज्ञ, पत्रकार, प्राध्यापक साहित्यिक अशांकडून. त्याशिवाय मोठ्या आणि बहुभाषिक होऊ लागलेल्या शहरांतील मराठी भाषकांनाही हे धोरण फारसे भावले नाही. कदाचित, बहुभाषिक शहरात मराठीला इतर भाषांची स्पर्धा असल्यामुळे त्यांना मराठीचा कैवार घेणे जास्त निकडीचे वाटले असणार. सरकारच्या धोरणाचे विरोधक (त्यांना सोईसाठी इंग्रजी - विरोधक म्हणू) या वादात पुढील युक्तिवाद करीत होते. आधीच मराठीची अवस्था दैन्याची आहे. (कुसुमाग्रजांचे 'ते' सुप्रसिद्ध भाषण!), मराठीवर इतर भाषांचे आक्रमण होत आहे, अशा वेळी या निर्णयामुळे मराठीचे महत्त्व कमी व्हायला हातभार लागेल. पहिलीपासून इंग्रजी शिकवून मराठी भाषा बोलणाऱ्यांमध्ये या भाषेविषयी न्यूनगंड निर्माण होईल व मराठीच्या विकासात अडसर निर्माण होईल (बनहट्टी पृ.५). शासनाचा युक्तिवाद खोडून काढताना असेही म्हटले गेले की, संगणक विज्ञान व त्यातील प्रणाली आता मराठीतही विकसित होत आहेत / झाल्या आहेत. त्यामुळे इंग्रजीची गरज खरे तर कमी होते (बनहट्टी पृ.१२). त्याहीपेक्षा 'महत्त्वाचा' मुद्दा बनहट्टी मांडतात. तो असा की, वाघिणीचे दूध पहिलीतील मुलांना पचणार का? (बनहट्टी पृ.१२,१३) मोरे यांनी त्यांच्या समर्थनासाठी म.फुलेंना या वादात ओढले, तर बनहट्टींनी डॉ. आंबेडकरांचा दाखला देऊन जीवनाच्या सर्व क्षेत्रांत मराठी वापरा, असे डॉ. आंबेडकरांनी (ही) सांगितले असल्याचा दावा केला (बनहट्टी पृ.१९).

याखेरीज 'इंग्रजी-विरोधकांनी' आणखी दोन मुद्दे मांडले. कोणाही शिक्षणतज्ज्ञाने पहिलीपासून इंग्रजी शिकविण्याची शिफारस केलेली नाही, शिक्षणविषयक आयोगांनीही तसे म्हटलेले नाही (म्हणजेच हे धोरण अशास्त्रीय आहे), हे विरोधकांनी दाखवून दिले आणि शिक्षणशास्त्र, विद्यार्थ्यांवरील भार इ. मुद्दे पुढे आणले. तसेच इंग्रजी शिकवणार कोण, कसे त्याची गुणवत्ता काय याचीही चिंता प्रगट झाली. चुकीचे इंग्रजी शिकवले जाईल, पाया कच्चा राहील, प्रशिक्षित शिक्षक नसतील, असे उपमुद्देही त्यात आले. म्हणजे 'मराठी'वरील अन्यायाखेरीज सरकारी धोरणाच्या त्रुटींवरील टीका झाली; पण ती मुख्यतः 'इंग्रजी नको - त्याने मराठीला स्पर्धा निर्माण होईल' या मुख्य युक्तिवादाला पूरक म्हणून, सरकारी धोरण अधिक परिपूर्ण व्हावे म्हणून नाही. एकूणच इंग्रजी-विरोधकांच्या युक्तिवादाचा मुख्य आधार भावनिक होता. उदाहरणार्थ, भालचंद्र मुणगेकरांनी या धोरणाविरुद्ध जो लेख लिहिला (लोकसत्ता २३ जानेवारी २०००, रविवार

पुरवणी), त्याचे शीर्षक होते : 'धक्कादायक आणि चुकीचा निर्णय'. त्यांना बसलेला धक्का इतका तीव्र असणार की त्या निर्णयात चुकीचे काय हे सांगायचेच राहून गेले! अशीच अवस्था वसंत बापटांचीही झाली. (साधना १५ जानेवारी २०००). त्यांनी हे धोरण म्हणजे 'मराठी हटाओ'चा जाहीरनामाच असल्याचे ठासून सांगितले. या भावनिक गदारोळात अशोक केळकरांची 'त्रिसूत्री' (इंग्रजी अध्यापन सुधारा, मराठी अध्यापन सुधारा, इंग्रजीसाठीची राज्यपातळीवरील संस्था बळकट करा.) काहीशी दुर्लक्षित राहिली.

गं.ना. जोगळेकर यांनी सरकारी धोरणाला विरोध करताना एक अभिनव तांत्रिक मुद्दा मांडला. साहित्य परिषदेतर्फे घेतलेल्या चर्चासत्रात (५ मार्च, २०००) त्यांनी सांगितले की, काठावरचे बहुमत असलेल्या सरकारने असा निर्णय घेणे अयोग्य आहे. त्याखेरीज हा निर्णय घेण्यापूर्वी सरकारने पुरेशी चर्चा केलेली नाही. तज्ज्ञांचा सल्ला घेतलेला नाही, हे केळकरांनी नोंदवले होते (एका धोंड्यात दोन पक्षी गारद! साधना, १५ जानेवारी, २०००).

इ. स. २०००-२००१च्या शैक्षणिक वर्षापासून सदर धोरणाची अंमलबजावणी सुरू झाली. सुमारे दीड लाख प्राथमिक शिक्षकांना त्यासाठी प्रशिक्षण देण्यात आले. त्यानंतरही दरवर्षी हा प्रशिक्षणाचा कार्यक्रम होतोच. सुमारे पावणे दोन कोटी मराठी विद्यार्थी दरवर्षी प्राथमिक स्तरावर इंग्रजीचे धडे गिरवू लागले आहेत. वाद झाला, तो नोव्हेंबर १९९९ ते मार्च २००० या काळात. त्यानंतर अंमलबजावणीविषयीचे उलटसुलट वृत्तान्त पहिले वर्षभर वर्तमानपत्रात येत राहिले. हळूहळू तेही थांबले. मराठी सारस्वत एका मोहिमेतून मोकळे झाले, तोवर दुसरी मोहीम त्यांच्यासाठी वाट पाहातच होती.

**माहिती तंत्रज्ञान**

महाराष्ट्र सरकारने २००१-२००२ या शैक्षणिक वर्षापासून अकरावी आणि बारावीसाठी माहिती तंत्रज्ञान हा नवीन विषय सुरू केला. तो सक्तीचा नाही; तर सर्व शाखांसाठी तो एक पर्यायी विषय आहे. तत्त्वतः हा नवा विषय अनेक वैकल्पिक विषयांपैकी एक म्हणून सुरू करण्यात आला आणि सध्या तरी त्याच्यासाठी मर्यादित जागाच उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. (रेखा पळशीकर, मराठी विरुद्ध माहिती तंत्रज्ञान : एक अनावश्यक लढाई, लोकसत्ता, ९ डिसेंबर २००१, रविवार पुरवणी). या धोरणाचे समर्थन रामकृष्ण मोरे यांच्या 'मराठीच्या भवितव्याचा बागुलबुवा दाखवून भेडसावू नका!' या लेखात आढळते.

(लोकसत्ता, २६ ऑगस्ट २००१, रविवार पुरवणी). माहिती तंत्रज्ञान हा विषय सुरू करण्याचा निर्णय शालेय अभ्यासक्रमाच्या राष्ट्रीय आराखड्यानुसार (नोव्हेंबर, २०००) झाला. माहिती तंत्रज्ञानाचे महत्त्व पूर्वसिद्धच आहे. दहावीपर्यंत मराठी सक्तीचे असतेच. पुढे वैकल्पिक म्हणून उपलब्ध आहेच. १९७५ पासूनच कनिष्ठ महाविद्यालय पातळीवर मराठी हा वैकल्पिक विषयच आहे; केवळ महाविद्यालयात शिकविल्याने विषय किंवा भाषा जगत / विकास पावत नाही. इ. सर्व तांत्रिक विकासवादी आणि समाजलक्षी मुद्दे सरकारी धोरणाच्या समर्थनासाठी पुढे आले. खुद्द शिक्षणमंत्र्यांखेरीज इतरांनी वाद पुढे नेताना जातीचा व सामाजिक विषमतेचा मुद्दा थेटपणे मांडला.'महाराष्ट्र टाइम्सच्या एका वाचकाने पत्र लिहून बहुजनांना नवीन क्षेत्र या धोरणामुळे उपलब्ध होईल, असा युक्तिवाद केला. सरकारी धोरणाचे टीकाकार प्रत्यक्षात बहुजनहिताचे मारेकरी असून माहिती तंत्रज्ञानामुळे ज्ञानाच्या मक्तेदारीला अखेरची घरघर लागली असल्याचे पत्र-लेखक म्हणतात (विशु काकडे, बहुतांशी अंतरे, म.टा. २४ ऑगस्ट २००१). हाच युक्तिवाद पुढे चालवीत सरकारी निर्णयाला विरोध हा 'बामणी कावा' असल्याचे पत्रक लक्ष्मण गायकवाड, कपिल पाटील, रामदास आठवले वगैरेंनी काढले (म.टा.२८नोव्हें. २००१). कपिल पाटील यांनी 'म.टा.' त लेख लिहून 'मराठीचे मारेकरी कोण?' (२ डिसें.२००१) असा प्रश्न उभा केला. सरकारी निर्णय मराठीची हानी करीत नाही हे सांगतानाच निर्णयाचे विरोधक मात्र ग्रामीण विरुद्ध शहरी आणि श्रीमंत विरुद्ध गरीब या द्वैतांविषयी अनभिज्ञ असल्याचा आक्षेप त्यांनी नोंदवला आहे.

मराठीसह भाषाविषयांना विकल्प म्हणून माहिती तंत्रज्ञान हा विषय ठेवण्याला फार तिखट विरोध झाला. वर्तमानपत्रांच्या रकान्यांमधून तर तो झालाच, पण मेळावे, धरणे या मार्गांनीही झाला. वर्तमानपत्रांतील चर्चेच्या वानगीदाखल 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये जुलैपासून आलेले काही लेख येथे विचारात घेतले आहेत ('लोकसत्ता'ची भूमिकाही सरकारी निर्णयाच्या विरोधात होती. 'सकाळ'नेही त्याची मराठीद्वेष्टे धोरण अशी संभावना केली. २२ नोव्हें., २००१). विरोधकांचे मुख्य आक्षेप असे होते - मुख्यतः मराठी भाषा हाच विषय सोडून विद्यार्थी माहिती तंत्रज्ञानाचा पर्याय स्वीकारतील, त्यामुळे पुढे पदवीपातळीवरील मराठी विषयाला धक्का पोचेल, मराठीची अवहेलना करणारा असा हा निर्णय आहे, भाषांना माहिती तंत्रज्ञान हा विषय वैकल्पिक ठेवणे हे

अशैक्षणिक आहे. 'मराठी भाषेवर सरकारी दरोडा' या लेखात डॉ. प्रकाश परब यांनी या धोरणाचे वर्णन 'सांस्कृतिक घातपात' असे केले. (म.टा.२७ जुलै २००१). आधीही मराठी विषय वैकल्पिकच होता. त्यात आणखी एका विकल्पाची भर पडली हा खुलासा 'गाय आधीच मारली, आता वासरू मारल्याबद्दल ओरड कशाला?' या कुळातला आहे असे त्यांना वाटले. अखेरीस ते मुंबईतील स्थितीपाशी पोचले आणि भविष्यात मुंबईतील परप्रांतीय लॉबी मुंबई महाराष्ट्रापासून अलग करण्यासाठी सक्रिय होईल, या धोक्याचा निर्देश करते झाले. विजय तापसांनी या निर्णयाचे वर्णन 'मायबोली मराठीला सरणावर चढविण्याचा महापराक्रम' असे केले. (म.टा.३१ जुलै २००१); तर शिरीन कुलकर्णी यांनी त्याला 'मऱ्हाटी संस्कृतीच्या ऱ्हासाचे पहिले पाउल' म्हटले (म.टा.९ ऑगस्ट २००१).

दरम्यान हा विरोध अधिक संघटित होऊ लागला आणि मराठी साहित्य महामंडळाने एक 'अन्याय निवारण समिती' स्थापन केली (म.टा.२० ऑगस्ट २००१). छात्रभारती संघटनाही आंदोलनात उतरली. मुंबईत २८ नोव्हेंबर, २००१ रोजी विविध नामवंतांनी सरकारच्या निषेधार्थ धरणे धरले. त्याला य.दि.फडके, नलिनी पंडित, नारायण सुर्वे, विजया राजाध्यक्ष, मृणाल गोरे, विठ्ठल शिंदे, राजन खान, रझिया पटेल, निखिल वागळे या व्यक्तींचा पाठिंबा होता; तर राष्ट्रसेवा दल, सत्यशोधक विद्यार्थी संघटना, जनआंदोलनांचा राष्ट्रीय समन्वय, एस्.एफ्.आय्. विद्रोही सांस्कृतिक चळवळ इ. संघटनांनी सक्रीयपणे आंदोलनात भाग घेण्याचे ठरवले होते (म.टा.२८ नोव्हेंबर, २००१). मराठवाडा साहित्य संमेलनाने मराठीला पर्याय ठेवू नये आणि पहिलीपासून इंग्रजी शिकवू नये, असा ठराव केला (म.टा.१३ डिसें.२००१); तर बालकुमार साहित्य संमेलनात अध्यक्षपदावरून रत्नाकर मतकरींनी सरकारी धोरणावर टीका केली. (म.टा.२६ डिसें.२००१). बुद्धिवंत आणि पत्रकारांच्या विरोधाचा सूर लक्षात घेऊन शासनाने डॉ. विजय भटकर यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली खरी; पण एकीकडे ते धोरण पुढे रेटणे चालू ठेवले, त्यावरूनही वाद निर्माण झाला. समितीतून (तिने अहवाल सादर केल्यानंतर) प्रमोद नवलकर बाहेर पडले; तर सरकारच्या निषेधार्थ निखिल वागळे यांनी साहित्य आणि संस्कृती मंडळाच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला.

या सर्व गदारोळानंतर २००२च्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष बनहट्टी यांनी

११वी-१२वीच नव्हे; तर पदव्युत्तर पातळीपर्यंत मराठी विषय सक्तीचा करावा अशी मागणी केली. इतकेच नाही; तर सरकारी नोकरीसाठी महाराष्ट्रात मराठी साहित्याच्या पदवीची अट घालावी असे सुचविले (बनहट्टी पृ.९-११ आणि पृ.१४-१५). त्याला त्यांनी दोन कारणे दिली. एक म्हणजे साहित्याचा अभ्यास केल्यशिवाय आपली भाषा किती समर्थ आहे, सुंदर आहे, हे समजत नाही (पृ.१०) आणि दुसरे म्हणजे मराठी साहित्याच्या अभ्यासाने एकात्म मराठी समाज निर्माण होण्यास मदत होईल (पृ.११). साहित्य संमेलनानंतर माहिती तंत्रज्ञानाविषयीचे आंदोलन मागे पडले आणि बनहट्टींच्या सूचनेवरही विशेष चर्चा झाली नाही. मुळात आंदोलन झाले ते पुणे-मुंबई या शहरांत. त्याशिवाय इतर ठिकाणी जिथे सहित्यविषयक संघटनांचे कार्य आहे अशा नागपूर, औरंगाबाद या ठिकाणी काही कार्यक्रम झाले. जानेवारी २००२ नंतर ही चर्चा काहीशी मागे पडली आणि मग बंद पडली.

जानेवारी-फेब्रुवारी२००२च्या 'अनुष्टुभ'च्या अंकात या विषयासंबंधाने चर्चा झालेली दिसते. संपादकीयात प्रभाकर बागले यांनी असे म्हटल्याचे आढळते की शासनाचे समर्थन करणाऱ्यांचे प्रतिपादन आवाहक असते. एका गटाच्या पाठिंब्यामुळे जनता व विद्वत्ता यांच्या बांधणीतून एक प्रतिमा तयार होते आणि धोरणाच्या मानसिक स्वीकारासाठी ती पोषक ठरते. मग धोरणविषयक मूलभूत चर्चेची गरज भासत नाही (पृ.१). या अंकात शासनाच्या निर्णयांना विरोध करणारे लेख आहेत. मात्र या लेखांमध्ये मुळात मराठीपासून शहरी पांढरपेशा वर्ग दूर गेला आणि आता बहुजन समाजाचा दृष्टिकोन बदलू लागल्याचा उल्लेख आहे (मराठीचा प्रश्न : हरिश्चंद्र थोरात, अनुष्टुभ जाने-फेब्रु.२००२, पृ.९). तसेच आपण इंग्रजीला योग्य प्रकारे सामोरे जाऊ शकलो नाही आणि मराठी समाजाला मराठीविषयी फारशी आस्था नाही, असे रत्नाकर मंचरकरांनी स्पष्टपणे नोंदवले आहे (वृथा ही बढाई सुकार्याविणे, रत्नाकर मंचरकर - पृ.१३ व १४). ते तर म्हणतात की, 'मराठी विषयीचे आपले प्रेम वाचाळ अधिक आणि कृतिशील कमी आहे' (पृ.१५). तसेच वसंत पाटणकर नोंदवतात की 'मराठीच्या संदर्भात जे आंदोलन सध्या चालू आहे ते मुख्यतः मुंबई-पुण्यापुरतेच (खरेतर मुंबईपुरतेच) मर्यादित आहे' (हद्दपारीच्या वाटेवरील मराठी भाषा, पृ.२५). त्याचे कारण त्यांच्या मते कोणतीही भाषा ही सांस्कृतिक सत्तेचा आविष्कार करते. त्यामुळे तेथील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादात या दुहीची बीजे आहेत. एकूणच मराठीची बाजू

घेणाऱ्या 'अनुष्टुभ' मधील या लेखांमध्ये सामाजिक-राजकीय वास्तवाचे जास्त सुस्पष्ट भान आढळते आणि त्या वास्तवातच कदाचित या दोन्ही वादांचा अकाली मृत्यू का झाला, याचे उत्तर असेल.

**मराठी मध्यमवर्गाची कोंडी**

मराठी भाषेच्या या राजकारणाची जर संगती लावायची झाली, तर मराठी भाषकांचे सामाजिक आर्थिक विश्व लक्षात घ्यायला हवे. मुंबई परिसरात बहुभाषिक वातावरणात आढळते. त्या संदर्भात दोन प्रतिक्रिया उमटताना दिसतात. एक म्हणजे परप्रांतीयांना मुंबईत येऊ देऊ नये आणि दुसरी म्हणजे आले, तरी मुंबईचे मराठीपण कसोशीने टिकवावे. मात्र मुंबईचे व्यवहार एव्हाना बहुभाषिक बनले आहेत. कोकणात कोकणी भाषेत परस्पर-संवाद साधला जाण्याचे प्रमाण मोठे आहे. सोलापूर-कोल्हापूर भागांत कन्नड भाषा बऱ्यापैकी बोलली जाते. अशाप्रकारे इंग्रजी, गुजराती, कोकणी, हिंदी, कन्नड, तेलगू, इ. भाषांचा वावर महाराष्ट्रीय व्यवहारात आढळतो आणि दुसरीकडे हिंदी सिनेमा, दूरचित्रवाणीची इंग्रजी चॅनल्स् यांचाही प्रादुर्भाव आहेच. या पार्श्वभूमीवर बहुसंख्य मराठी माणसे आपसात, घरात, कित्येकदा व्यवहारात आणि शिक्षणातही मराठीचाच वापर करतात. त्याचबरोबर मध्यमवर्गाला आपल्या भौतिक उन्नतीसाठी इंग्रजी / हिंदी या भाषांवर प्रभुत्व मिळवावे लागते आणि दुहेरी स्पर्धेला तोंड द्यावे लागते. एकीकडे हिंदी भाषकांशी नोकऱ्यांच्या संदर्भात त्याला विषम स्पर्धेला तोंड द्यावे लागते कारण या मध्यमवर्गाचे हिंदी हे 'बंबैया' किंवा सिनेमातले हिंदी असते. दुसरीकडे या मध्यमवर्गाला इंग्रजी माध्यमात शिकलेल्या उच्च मध्यमवर्गीयांशी (मराठी व बिगर मराठीही) स्पर्धा करावी लागते. तिथे त्याचे सुमार इंग्रजी आड येते. या कोंडीतील मध्यमवर्ग भाषा प्रश्नी आवाहक, प्रतीकलक्षी, भावुक आव्हानांना चटकन प्रतिसाद देतो. 'मराठीची गळचेपी' ही करुण कहाणी त्याला आपली वाटते; कारण तिथे तो मराठी भाषेऐवजी स्वतःच्या भवितव्याची भेसूर रूपे कल्पित असतो. नेमक्या याच कारणांमुळे भाषेच्या राजकारणाचे आपण जे नमुने पाहिले, त्यांना शहरात, पांढरपेशा सुशिक्षित वर्गात प्रतिसाद मिळतो. मराठीची कोंडी त्यांच्या दृष्टीने सांस्कृतिक कोंडी नसते, तर त्यांच्या स्वतःच्या भौतिक जीवन-व्यवहारांच्या कोंडीचे ते प्रतिरूप असते.

कोणतेही राजकारण चालते, पुढे जाते, ते काही केवळ त्याच्या तत्त्ववैचारिक भूमिकेमुळे नव्हे; तर त्या राजकारणात सहभागी होणाऱ्या

सामाजिक शक्तीमुळे. मराठीच्या राजकारणाच्या अग्रभागी कोण होते? त्यांच्या हेतूंविषयी शंका न घेता आणि त्यांच्या सामाजिक स्थानाची हेटाळणी न करता, बुद्धिजीवी-बुद्धिवंत असे त्यांचे वर्णन करता येईल. त्यांना स्फुट-अस्फुट प्रतिसाद देणारा वर्ग हा मध्यमवर्गाचा एक भाग होता. या अर्थाने पुढारी आणि पाठीराखे यांचे सामाजिक स्थान जवळपास एकसारखेच होते. मराठी मध्यमवर्गाला मराठीचा मुद्दा का भावतो, हे वर सांगितलेच आहे, पण मराठी मध्यमवर्गाच्या कोंडीचा आणखी एक परिणाम घडून येतो. तो म्हणजे कोणत्याही सामाजिक-सांस्कृतिक मुद्यावर दीर्घ मुदतीची किंवा स्वतःला गुंतवून घेणारी कृती करण्यास हा वर्ग तयार नसतो. त्याची कोणत्याही सामाजिक-सांस्कृतिक मुद्याशी संलग्नता थिल्लर असते आणि भावनिकता व भूतरमणीयता यांच्या मदतीने ती अल्पकाळ टिकवता येते. त्यामुळे मध्यमवर्गाच्या मदतीने काही राजकारण करायचे म्हटले, की त्यातही ही वैशिष्ट्ये येतातच आणि तरीही ते राजकारण अल्पकालीनच राहते.

**भाषेचे भावुक राजकारण**

इंग्रजीविरोध किंवा तंत्रज्ञानाविषयीचा वाद या दोन्हींत काही समान वैशिष्ट्ये दाखवता येतात. एक तर दोन्हींत मराठीची भूमिका आक्रंदनाची, तक्रारीची आणि भावुक राहिली. 'असं होऊच कसं शकतं'? अशा धक्कामिश्रित दुःखाची भूमिका राहिली. त्यामुळे वादातील मराठीची बाजू भावनाप्रचुर जास्त आणि भौतिक व्यवहारांशी कमी संलग्न होती. दुसरे म्हणजे सामाजिक चिरफळ्यांच्या संदर्भात या वादातील मराठीवादी कोंडीत पकडले गेले - व्यक्तिशः नव्हे; तर समूह म्हणून. महाराष्ट्रातील पांढरपेशा वर्ग मुलांना इंग्रजी माध्यमात शिकवतो, उच्च तंत्रज्ञानात पारंगत बनवतो, हे तर दिसतेच आहे. अशांपैकी काहींनी इंग्रजी नको, माहिती तंत्रज्ञान हा मराठीला पर्याय नको, असे म्हणणे विसंगत तर दिसतेच; पण हा मुद्दा नैतिकतेचा नाही तर सामाजिक विसंगतीचा आहे. एका गटाने मराठीशी प्रतारणा करायची आणि त्याच्याच दुसऱ्या उपवर्गाने उर्वरित समाजाला मराठीची कास धरायला सांगायचे, ही विसंगती मराठीच्या राजकारणाला पोकळ बनवते. तिसरे वैशिष्ट्य असे, की - शासनाच्या निषेधाभोवती गोळा झालेल्या या राजकारणात शासनाला हालविण्याची शक्ती सहसा नसते. (ते लक्षात न घेता 'लढण्याची भाषा' होते ते अलाहिदा!) त्यामुळे मराठीचे हे राजकारण अधूनमधून डोके वर काढत वर्तमानपत्रांच्या जिवावर चालते आणि कालांतराने थंड पडते. त्यातून मूळ विषयावर तोडगा निघत नाही की समाजाची भाषाविषयक जाणीव प्रगल्भ होत

नाही. वर्णनाच्या सोईसाठी आपण ह्या राजकारणाला भाषेचे भावुक राजकारण असे म्हणूयात.

हे भावुक असले, तरी निरागस राहीलच असे मात्र नाही. कारण भाषेचा मुद्दा संस्कृती, इतिहास, यांच्याबरोबरच भौतिक व्यवहारांमधील समस्यांशी विपरीत पद्धतीनेही जोडता येतो. त्याच्या आधारे परभाषकांना 'लक्ष्य' करून परद्वेषाचे आक्रमक व स्फोटक राजकारण कसे घडते, याचा महाराष्ट्राला अनुभव आहे. भावुक राजकारण व हे परद्वेषाचे राजकारण यांच्यातील संबंधांचे भान ठेवणे गरजेचे आहे. इंग्रजीविरोधी किंवा माहिती तंत्रज्ञान हा भाषेला पर्याय ठेवण्यास विरोध करणाऱ्यांपैकी अनेकजणांना मुंबईतील आक्रमक परद्वेषाचे राजकारण मान्य नसेलही; पण शिवसेनेच्या भाषिक राजकारणाला एक भावनिक बैठक आणि वैचारिक अधिमान्यता पुरविण्याचे काम भावुक राजकारण करते. १९६० व १९७०च्या दशकांतही मुंबईतील अनेक मराठी पत्रकार व बुद्धिजीवी यांची भूमिका शिवसेनेच्या नैतिक समर्थनाचीच होती. आजही हीच परिस्थिती आहे. मराठीविषयी सातत्याने संपादकीय आणि नावानिशी मजकूर लिहिणारे भरतकुमार राऊत यांची ही भूमिका पाहा : ठाकरेंच्या पंचाहत्तरीनिमित्त लिहिलेल्या अग्रलेखात ते म्हणतात, 'आजही मराठी माणूस व भाषा यांच्या शत्रूंविरुद्ध रान उठवणे आवश्यक आहे. ती ताकद आजही ठाकरेंमध्येच आहे. तसे व्हावे ही अमृतमहोत्सवानिमित्त शुभेच्छा:!' (वाघाचे नेतृत्व म.टा. संपादकीय, २३ जाने.२००२). त्यांचेच दुसरे सहकारी प्रकाश अकोलकर याच निमित्ताने म्हणतात, 'मराठी अस्मिता कायम राहण्यासाठी आजही महाराष्ट्राला शिवसेनेची गरज आहे. मराठी माणसांच्या प्रश्नासाठी कायम रान उठवणारे बाळासाहेब त्यांची ही अपेक्षा पुरी करील काय? (अस्मितेचा अमृतमहोत्सव म.टा.२३ जाने.२००२). पोकळ आणि भावुक असे भाषेचे राजकारण प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने भाषेच्या आक्रमक आणि परलक्षी राजकारणाशी जोडले जाते. हे महाराष्ट्रातील अनुभवावरून म्हणता येते.

**पर्याय**

भाषेचे राजकारण कसे करावे, याचा आराखडा देणे हा काही प्रस्तुत निबंधाचा उद्देश नाही. पण कोणत्या पर्यायांच्या अभावामुळे महाराष्ट्रात भाषेची भावुक व विपर्यस्त राजकारणे घडतात, याची चर्चा करणे आवश्यक आहे. शासन मराठीचे रक्षण करते - करेल आणि तेवढ्याने भागेल ही वृत्ती मराठीविषयक राजकारणात नेहमी आढळते. त्यामुळेच मागण्यांच्या यादीखेरीज मराठीचे

राजकारण करणाऱ्यांपाशी फारसे काही नसते. म्हणजेच भाषेचे क्रियाशील राजकारण महाराष्ट्रात घडले नाही. विश्वकोश, शब्दकोश, ग्रंथालय चळवळ इ. घडामोडी शासनाच्या आश्रयानेच तेवढ्या चालल्या. त्यापलीकडे समाजात मराठी भाषा, साहित्य, संस्कृती यांची चळवळ शून्यवत राहिली. जे विविध प्रयत्न होत राहिले, ते एकाकी, अल्पजीवी किंवा अल्पशक्ती राहिले. आज सरकारविरुद्ध दंड थोपटून बंडाची भाषा करणाऱ्या साहित्य महामंडळाने, विविध साहित्य परिषदांनी, साहित्य संमेलनांनी मराठीसाठी कोणते संस्थात्मक, दीर्घ मुदतीचे विधायक राजकारण केले? आपले भाषिक राजकारण गाववाल्या किंवा गटवाल्या पट्ठ्याला अध्यक्ष करण्यासाठी संमेलन कोठे भरवायचे याच्या कारस्थानापासून सुरू होते आणि तिथेच थांबते. आपल्या साहित्यिक चळवळी कथाकथन आणि काव्यगायन यांच्यापुढे जाऊन साहित्यिक व तात्त्विक चर्चा मराठीतून सार्वजनिकपणे करण्याचा प्रयत्नही करीत नाहीत. मराठीच्या नावाने लेखणीच्या तलवारी करणारी वृत्तपत्रे गंभीर लेखांसाठी कधीमधी आठ पंधराशे शब्दांची जागा पुरवतात. तेवढीच पुस्तक व परीक्षणे तर दोनदोनशे शब्दांतच मागणारे बहाद्दर आपल्यात आहेत. सरकार-दरबारी सतत हात पसरून बसणारे प्रकाशक मराठीसाठी म्हणून काही प्रकाशित करायला तयार होतील का? गंभीर लेखन, कोश वाङ्मय अशा लेखनापासून प्रकाशक दूर का पळतात? एकूणच भाषाप्रेम हा टाहो फोडण्याचा विषय न होता ती विधायक चळवळ होणे, हे भाषेचे एक पर्यायी राजकारण ठरू शकते. मराठीला ज्ञानपीठ किंवा नोबेल का मिळत नाही, असल्या गैरलागू चर्चांपेक्षा केरळ शास्त्र साहित्य परिषदेप्रमाणे विज्ञान, भाषा आणि संस्कृती यांची एकवट करणारे राजकारण महाराष्ट्रात नाही, याची दखल घ्यायला हवी. ते परभाषाद्वेषाचे किंवा न्यूनगंडाचे राजकारण नसेल किंवा संकुचित, मध्यमवर्गीयही नसेल. जनभाषा आणि जनसंस्कृती यांवर आधारलेल्या भाषिक राजकारणाची ही दिशा आहे. पूर्वसंचिताची निरोगी चिकित्सा, पूर्व-गौरववादाचा त्याग, बहुभाषिकतेचा अभिमान, प्रतिकात्मकतेपाशी न थबकणे इ. काही या पर्यायी राजकारणाच्या शर्ती असतील. अशा राजकारणाच्या अभावामुळे मराठीचे राजकारण भावुकता आणि विपर्यासाच्या चक्रात अडकते आहे.

भाषेच्या राजकारणाचा दुसराही एक पर्याय असू शकतो. तोही महाराष्ट्रात आजमितीस फारसा अस्तित्वात नाही. तो आहे धुरीणत्वविरोधी राजकारणाचा. लेखाच्या प्रारंभी म्हटल्याप्रमाणे भाषा हे धुरीणत्वाचे हत्यार असते. भाषेला

धुरीणत्वाच्या बटीकपणातून वाचवणे हे भाषेचे पर्यायी राजकारण असू शकते. म्हणजेच भाषा, भाषिक कौशल्ये, साहित्य आणि संस्कृती यांचा जो संमती जडणघडणीसाठी वापर होतो, त्याला आव्हान दिले जाऊ शकते आणि भाषा हे धुरीणत्वविरोधी सांस्कृतिक चळवळीचे हत्यार होऊ शकते. महाराष्ट्रात गेल्या शतकात महात्मा फुल्यांनी तर अलीकडच्या काळात दलित साहित्याने भाषेचा असा वापर करण्याचे प्रयत्न केले. मात्र नंतर हे प्रयत्न निव्वळ पर्यायी प्रतीकांच्या रचनेपुरते मर्यादित झाले. तसेच या प्रयत्नाला धुरीणत्वाविरुद्धच्या सामाजिक चळवळींची साथ मिळाली नाही; परंतु भाषेचे राजकारण कोणत्या दिशेने जाऊ शकते, याची झलक या सर्व प्रयत्नांमधून मिळू शकते. दलित, ग्रामीण, आदिवासी, स्त्रीवादी अशा सर्वच साहित्य - प्रवाहांनी मराठीच्या धुरीणत्ववादी राजकारणापुढे आव्हान उभे केले. या प्रवाहांमधून पर्यायी सिद्धान्तन झाले नाही. त्यामुळे मराठी विचारविश्वात ब्राह्मणी-अब्राह्मणी या वर्गवाऱ्या बिरुदासारख्या वापरल्या जाऊ लागल्या. परिणामी त्याही पोकळ राहिल्या. बिरुदांनी धुरीणत्वापुढे सहसा आव्हान उभे राहू शकत नाही, तेच येथेही घडले. म्हणून आज मराठीत धुरीणत्वविरोधी असे पर्यायी भाषिक-सांस्कृतिक राजकारण नाही; परंतु भाषेच्या राजकारणाचा तो एक पर्यायी आकृतिबंध संभवतो. मराठीच्या राजकारणात क्रियाशील किंवा धुरीणत्वविरोधी अशा दोन्ही राजकारणांची क्षीणता किंवा अनुपस्थिती यांमुळे पोकळ भावुक किंवा विपर्यस्त राजकारणांना अवसर मिळतो, असा या प्रतिपादनाचा सारांश आहे.

**टिपा :**

१) राज्यघटनेच्या ३४३ ते ३५१ या कलमांमध्ये भाषाविषयक तरतुदी आहेत. मूळ राज्यघटनेत हिंदी ही अधिकृत भाषा म्हणून ठरवून पंधरा वर्षेपर्यंत इंग्रजी ही अधिकृत व्यवहारासाठी वापरण्याची तरतूद होती. म्हणजेच केंद्र-राज्य किंवा आंतरराज्य व्यवहार इंग्रजीत होईल, अशी तरतूद होती. खेरीज, आठव्या परिशिष्टात समाविष्ट केलेल्या सर्व भाषांना 'राष्ट्रीय' भाषांचा दर्जा दिला गेला. केंद्राच्या व्यवहारात हिंदी व इंग्रजी दोन्ही वापरणे शक्य झाले, तर राज्यांतर्गत व्यवहारात प्रादेशिक भाषा वापरणे शक्य झाले.

२) मूळ घटनात्मक तरतूद १५ वर्षांसाठी होती. १९९५ पासूनचे भाषाधोरण हे खेरांच्या अध्यक्षतेखालील 'ऑफिशियल लँग्वेज कमिशन'च्या

शिफारशीनुसार ठरले. त्यानुसार १९६५ पासून हिंदी ही भारताची अधिकृत भाषा झाली. मात्र इंग्रजीच्या वापराला 'असोशिएट ॲडिशनल ऑफिशियल लँग्वेज' म्हणून मान्यता दिली गेली.

३) कोकणी भाषेचा समावेश घटनेच्या ८ व्या परिशिष्टात (राष्ट्रीय भाषा) १९९२ मध्ये केला गेला.

**संदर्भ :**

(वृत्तपत्रे व नियतकालिके यांतील लेखांचे संदर्भ मूळ निबंधातच दिले आहेत.)

१) ऑस्टिन ग्रॅनव्हिल, १९६६, द इंडियन कॉन्स्टिटयूशन : कॉर्नरस्टोन ऑफ ए नेशन, बॉम्बे, ऑक्सफर्ड युनि. प्रेस.

२) बनहट्टी राजेंद्र, २००२ अ.भा.साहित्य संमेलन अध्यक्षीय भाषण, पुणे, अ.भा. मराठी साहित्य महामंडळ.

३) ब्रॉस पॉल, १९९२, दी पॉलिटिक्स ऑफ इंडिया सिन्स इंडिपेंडन्स, केंब्रिज, केंब्रिज युनि. प्रेस.

४) मोरे रामकृष्ण, २०००, नव्या शतकाची नवी दिशा, पुणे, पुणे जिल्हा शिक्षण मंडळ.

■

**(दि. १ मे आणि २ मे रोजी 'भाषिक नीती आणि व्यवहार' या विषयावर झालेल्या चर्चासत्रामध्ये वाचलेला निबंध - संपादक)**

**राज्यशास्त्र विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ७**

अव्याहृतं व्याहृतात् श्रेयमाहुः ।
सत्यं वदेत् व्याहृतं तद् द्वितीयम् ।
प्रियं वदेत् व्याहृतं तत् तृतीयम् ।
धर्म्यं वदेत् व्याहृतं तत् चतुर्थम् ॥ (महाभारत, उद्योगपर्व अ. ३६.१२)

विदुर धृतराष्ट्राला उपदेश करताना म्हणतात, "काही बोलण्यापेक्षा न बोलणे श्रेयस्कर. जे बोलायचे ते खरे बोलावे ही दुसरी श्रेयस्कर गोष्ट. दुसऱ्याला आवडेल असे बोलावे ही तिसरी गोष्ट आणि सर्वांत श्रेयस्कर चौथी गोष्ट अशी की आपले बोलणे धर्माला अनुसरून योग्य, न्याय्य असावे.

**प्रेषक - विजया देव**

# ‘भाषिक नीती आणि व्यवहार’ : चर्चासत्राचा वृत्तांत

विद्यागौरी टिळक आणि सुप्रिया सहस्रबुद्धे

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष, प्रसिद्ध भाषावैज्ञानिक डॉ. अशोक रा. केळकर यांना मिळालेल्या ‘पद्मश्री’ पुरस्काराच्या निमित्ताने त्यांचा गौरव करावा यासाठी ‘भाषिक नीती आणि व्यवहार’ या विषयावर दि. १ आणि २ मे रोजी एक चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. मराठी अभ्यास परिषद आणि पुणे विद्यापीठातील मराठी, हिंदी, संस्कृत, इंग्रजी, तत्त्वज्ञान हे विभाग आणि संस्कृत प्रगत अध्ययन केंद्र यांच्या संयुक्त विद्यमाने हे चर्चासत्र पुणे विद्यापीठाच्या शिवाजी सभागृहात उत्साहाने पार पडले.

दि. १ मे रोजी मराठी अभ्यास परिषदेच्यां कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी प्रास्ताविक केल्यानंतर चर्चासत्राचे उद्‌घाटन जवाहरलाल नेहरू विद्यापीठातील जर्मनचे अध्यापक, (हैदराबादच्या ‘सीफेल’ या संस्थेचे माजी कुलगुरु) डॉ. प्रमोद तलगेरी यांनी केले. अध्यक्षस्थानी पुणे विद्यापीठाच्या कलाशाखेचे अधिष्ठाता, प्राचार्य अशोक थोरात हे होते.

आपल्या उद्‌घाटनपर भाषणात भाषा आणि समाजव्यवहार या संदर्भातील आपल्यासारख्या बहुभाषिक आणि बहुसांस्कृतिक देशांतील प्रश्न कसे बिकट स्वरूपाचे आहेत, याविषयी त्यांनी विवेचन केले. भारतीय भाषांची खुरटलेली वाढ, कोणत्याही एका भाषेत संपूर्ण व्यवहार करण्याची अक्षमता आणि त्यामागची कारणे यांचा ऊहापोह त्यांनी आपल्या भाषणात केला.

दुसऱ्या सत्रामध्ये नामवंत भाषाभ्यासक डॉ. मिलिंद मालशे यांनी ‘भाषाविकासासाठी भाषावैज्ञानिक दिशा’ या विषयावर निबंध वाचला. या विषयामध्ये अंतर्भूत असलेल्या ‘भाषा’, ‘विकास’ आणि ‘विज्ञान’ या तीन संकल्पनांमागील संभाषितांचा विचार आवश्यक असल्याचे त्यांनी सांगितले. ‘विकास’ आणि विज्ञान’ या दोन्ही संकल्पनांची सविस्तर ऐतिहासिक चर्चा करीत त्यांनी भाषेकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातून आधुनिकपूर्व आणि आधुनिक काळात कसे परिवर्तन झालेले आहे, हे सांगितले. भाषिक नियोजनाच्या आणि भाषाविकासाविषयीच्या दृष्टिकोनात कसा बदल झाला आहे, त्यांनी हे स्पष्ट केले.

डॉ. मिलिंद मालशे यांच्या निबंधावर झालेल्या चर्चेमध्ये आशा मुंडले, प्र. ना. परांजपे, मीना गोखले, वंदना भागवत, विजया देव, सरोजिनी वैद्य, सुमन बेलवलकर, अशोक अकलूजकर इत्यादी अभ्यासकांनी भाग घेतला. त्यावेळी भाषेचा विचार करताना तिचा समाजाशी असलेला संबंध लक्षात घेणे आवश्यक असल्याचे सांगितले गेले. त्याचप्रमाणे आपल्या समाजाच्या गरजा, आपली परिस्थिती, संस्कृती यांचा विचार करूनच भाषिक नियोजन केले पाहिजे, असे मत या चर्चेत आग्रहाने मांडले गेले.

दुसरा निबंध हैदराबाद विद्यापीठातील इंग्रजीचे ज्येष्ठ अध्यापक डॉ. सुधाकर मराठे यांचा होता. 'इंग्रजीच्या भाषिक विकाससूत्रांची मराठीसाठी उपयुक्तता' या विषयावरील आपल्या इंग्रजी निबंधात त्यांनी इंग्रजी भाषेच्या भरभराटीमागची ऐतिहासिक, राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक कारणे विविध उदाहरणे देऊन विस्ताराने स्पष्ट केली. निबंधाच्या उत्तरार्धात त्यांनी इंग्रजी आणि मराठी या दोन भाषांमध्ये तुलना करण्यापेक्षा तिच्यासारखी परिस्थिती असलेल्या अन्य भाषांच्या तुलनेत पाहिले पाहिजे, असे सांगून मराठीची स्थिती अजिबात चिंताजनक नाही असे मत ठामपणे व्यक्त केले. लाखो लोक तिचा आपल्या जीवन-व्यवहारात वापर करीत आहेत, आधुनिक जीवन-व्यवहारातील कित्येक क्षेत्रांमधील आशयही तिने आपल्यात सामावून घेतला आहे, याकडे त्यांनी श्रोत्यांचे लक्ष वेधले. या निबंधावरील चर्चेत प्र. ना. परांजपे, डॉ.अशोक केळकर इत्यादींचा सहभाग होता. या चर्चासत्राचे अध्यक्ष डॉ. प्रमोद तलगेरी होते.

चर्चासत्राच्या दुसऱ्या दिवशीच्या पहिल्या सत्रात डॉ. सुहास पळशीकर यांनी 'भाषेचे राजकारण : मराठीचे राजकारण का फसले?' विषयावर निबंध सादर केला. या सत्राचे अध्यक्षपद म्हैसूरच्या सी.आय्.आय्.एल्.च्या उपसंचालिका डॉ. के. एस्. राज्यश्री यांनी भूषविले होते. पळशीकरांनी भारतातील भाषा-धोरण, भाषावार राज्यरचना इत्यादी बाबींची सविस्तर नोंद घेतली. पहिलीपासून इंग्रजी सुरू करणे, कनिष्ठ महाविद्यालयात मराठी विषयाला माहिती तंत्रज्ञानाचा पर्याय देणे, या राज्य सरकारच्या दोन निर्णयांच्या संदर्भातील राजकारणाची चर्चा यानिमित्ताने झाली. चर्चेत अनिल झणकर, किसन होळकर, वंदना भागवत, सुमन बेलवलकर, मीना गोखले इत्यादी अभ्यासकांनी भाग घेतला. अध्यक्षीय समारोपात डॉ. राज्यश्री यांनी सांगितले की, जी परिस्थिती मराठीविषयी आहे, तीच कन्नड किंवा इतर प्रांतिक भाषांविषयीसुद्धा आहे.

यानंतर मो.गो. धडफळे यांनी 'मराठीच्या विकासासाठी संस्कृतची आवश्यकता' या विषयावरील निबंध वाचला. मराठीतील शब्दांची प्रचंड मागणी पूर्ण करण्यासाठी मराठीला संस्कृतची आवश्यकता आहे हे डॉ. धडफळे यांनी स्पष्ट केले. या निबंधाच्या चर्चेत सरोजा भाटे, सरोजिनी वैद्य यांचा सहभाग होता.

प्रा. लीला अर्जुनवाडकर यांनी आपल्या अध्यक्षीय समारोपात मराठीमध्ये किती प्रमाणात संस्कृत आहे हे आपण ओळखत नाही, असे सांगून दोन्ही भाषांचे साहचर्यच दाखवून दिले.

पुढील सत्रात विश्वनाथ खैरे यांचा 'मानवी विकास आणि भाषा : अंतःसंबंध' या विषयावरचा निबंध होता. हैदराबादचे प्रा. द. पं. जोशी अध्यक्षस्थानी होते. भाषेचे उगमस्थान मेंदूत आहे. भाषा आणि मेंदू या दोन्हींचा संबंध जुळ्यासारखा असतो व ते एकमेकांवर अवलंबून असतात, असे त्यांनी मानववंशशास्त्राच्या आधारे स्पष्ट केले.

या चर्चासत्रात 'भाषिक नीती आणि व्यवहार' या विषयावर खुली चर्चा मुद्दाम आयोजित केली होती. त्यामध्ये मॅक्सिन बर्नसन, नीती बडवे, ग. उ. थिटे, अशोक अकलूजकर, पद्माकर दुभाषी अशा अनेक मान्यवरांनी उत्स्फूर्त भाग घेतला होता. मराठी भाषेविषयी आणि एकूणच भाषा व्यवहाराविषयी विविध मौलिक विचार या वेळी व्यक्त झाले. मराठीविषयी वाटणारी आस्था त्यांच्या बोलण्यातून जाणवत होती. या खुल्या चर्चेत प्रा. द. पं. जोशी यांनी अध्यक्षपदाची धुरा सांभाळली होती. त्यांच्या अध्यक्षीय समारोपात त्यांनी हैदराबादमधील भाषेची उदाहरणे देऊन विवेचन केले. चर्चासत्रातील एक महत्त्वाचा भाग होता तो म्हणजे डॉ. अशोक केळकरांची प्रकट मुलाखत. प्रा. प्र. ना. परांजपे आणि डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांनी घेतलेल्या मुलाखतीमध्ये एका प्रश्नाच्या संदर्भात डॉ. केळकर म्हणाले की, मी सन्मानासाठी काम केले नाही, आनंदासाठी केले; पण सन्मानामुळे आनंद झाला कारण मी ज्या गोष्टींसाठी इतकी वर्षे झगडलो त्या गोष्टींकडे लोकांचे लक्ष वेधले गेले.

अंतिम सत्रात डॉ. केळकरांचा सत्कार त्यांचे फर्गसन महाविद्यालयातील गुरू प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या हस्ते करण्यात आला. त्या वेळी प्रा. प्रधान म्हणाले की, 'केळकरांनी भाषासौंदर्याचे व्याकरण आणि व्याकरणाचे सौंदर्य जाणले आहे ही विशेष बाब आहे. केळकरांना स्वतःचे क्षितिज गवसले आहे.'

डॉ. केळकरांनी सत्काराला दिलेल्या मितभाषी उत्तरात मराठी व्यवहार

बहुपेडी होण्याची गरज प्रतिपादन केली. शेवटी डॉ. गं.ना. जोगळेकर यांनी आभार मानल्यानंतर चर्चासत्राची सांगता झाली.

एकंदर या चर्चासत्रामध्ये मराठीच्या आजच्या परिस्थितीचा भवितव्याचा व त्यासाठी करावयाच्या प्रयत्नांचा अनेक अंगांनी सखोल विचार केला गेला. एकांगिकापणा व निराशावाद टाळून मराठीच्या उत्कर्षासाठी प्रयत्न करणे महत्त्वाचे आहे ही जाणीव अधोरेखित करणे हे या चर्चासत्राचे फलित म्हणावे लागेल.

■

'साक्षराः' विपरीताः चेद् 'राक्षसाः' एव केवलम् ।
'सरसः' विपरीतोऽपि 'सरस'त्वं न मुञ्चति ॥

'साक्षराः' हा शब्द उलटीकडून वाचला तर 'राक्षसाः' असा होतो. 'सरस' हा शब्द मात्र उलट केला, तरी 'सरस'च राहतो.

नुसती साक्षरता म्हणजे पढीक ज्ञान माणसावर उलटू शकते, तो साक्षर असून राक्षसी वृत्तीचा होतो; पण सहृदयतेने ज्ञान पचवलेला रसिक मात्र विपरीत परिस्थितीत सापडला तरी रसिक, सहृदयच राहतो.

**प्रेषक - विजया देव**

## सूचना फलक

वर्ष २०:२ / उन्हाळा २००२ या अंकातील काही चुकांबद्दल दिलगिरी व्यक्त करत आहोत.

**तपशील पुढीलप्रमाणे** -

१) पृष्ठ : १५ - महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्थेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या मासिकाचे नाव 'भाषापत्र' आहे.

२) पृष्ठ : २८ - "कोट्यावधी" ऐवजी "कोट्यवधी"

३) पृष्ठ : ३१ - "चूकिचं" ऐवजी "चुकीचं"

४) पृष्ठ : ३७ - 'विद्यापीठ प्रशासनाचे मराठीकरण' या ग्रंथाचे प्रकाशक, "शिवप्रताप प्रकाशन, पुणे" हे नसून "सारंग प्रकाशन, मुंबई" हे आहेत.

५) पृष्ठ : ३६ - "द्वन्द्वौ" ऐवजी "द्वन्द्वो", "स्थां" ऐवजी "स्थां"

# प्रदक्षिणा

मो. गो. धडफळे

देवळात देवाच्या मूर्तीला प्रदक्षिणा घातल्याने पुण्य लाभते ही धार्मिक श्रद्धा आहे. गरोदर स्त्रीने मारुतीला प्रदक्षिणा घालावी, असे म्हणतात. याचे कारण तिला काही एक आवश्यक व्यायाम व्हावा असे आहे, असे हल्लीच्या 'शास्त्रीय' पद्धतीने त्याचे एक स्पष्टीकरण देण्यात येते.

आज देवाच्या मूर्तीला, पवित्र वृक्षांना, चैत्यांनाच प्रदक्षिणा घातली जाते. पूर्वी वन्दनीय व्यक्तींनाही प्रदक्षिणा घातली जायची. पाली तिपिटकांत अनेक ठिकाणी भिक्षू व उपासक गौतम बुद्धाला प्रदक्षिणा घालून निघून गेले असा उल्लेख येतो. (भगवन्तं पदक्खिणं कत्वा पक्कमि)

'प्रदक्षिणीकृत्य हुतं हुताशं ... धेनुं सवत्साम्'

सवत्स (नंदिनी) गाईला प्रदक्षिणा घालून दिलीप आपल्या राजधानीला निघाला, असे कालिदास सांगतो. (रघुवंश २.७१)

कोणाकोणांस प्रदक्षिणा अभिप्रेत आहे, याची यादी मनूने दिली आहे.

मृदं गां दैवतं विप्रं घृतं मधु चतुष्पदं । प्रदक्षिणानि कुर्वीत .... (मनुस्मृति ४.३९)

कर्नाटकातील श्रवणबेळगोळ येथील गोमटेश्वराच्या मूर्तीखालील शिलालेखात -

"श्री चावुण्डराजे करवियले
गंगराजे सुत्ताले करवियले"

यातील सुत्ताले याचा अर्थ गोलाकार प्रदक्षिणा घालण्यासाठी असाच आहे.

प्रदक्षिणा ही संकल्पना केवळ हिंदुस्थानातलीच किंवा हिंदू धर्मीयांमधलीच आहे असे नाहीं. पृथ्वी सूर्याच्या भोवती फिरते व सूर्यही फिरतो, रथाचे चाक फिरते, या गतीची कल्पना प्रदक्षिणेच्या पाठीशी आहे.

प्रत्येक हाज-यात्रेकरूने मक्केच्या यात्रेच्या वेळेला तीन गोष्टी करायच्या असतात.

१) इहराम - कमरेवर व खांद्यावर एकेक वस्त्र लेणे. २) अरफाम - एका डोंगराची यात्रा करणे व ३) तवाफ - काबाच्या दगडाला प्रदक्षिणा घालणे.

प्रदक्षिणा म्हणजे 'pro-दक्षिणा' अर्थात दक्षिणेच्या बाजूने (गती), उजवीकडे वळणे, 'प्रगतं दक्षिणमति' - पूज्य देवतेला किंवा व्यक्तीला उजवे ठेवून तिच्याभोवती फेरी घालणे. घड्याळाच्या काट्यांची ही फिरण्याची दिर्शा आहे. उलटे म्हणजे 'प्र-वाम' गोलाकार फिरू नये; और्ध्वदैहिकांत प्रेताभोवती घडा खांद्यावर घेऊन फिरण्याचा तो विधी असतो.

कोणत्या देवाला किती प्रदक्षिणा घालाव्यात, याचा संकेत पुढील श्लोकात दिला आहे.

"एकं देव्यां, रवौ सप्त, त्रीणी कुर्याद्विनायके ।
चत्वारि केशवे कुर्यात्, शिवे चार्धप्रदक्षिणम्" ।

"देवीला एक, सूर्याला सात, विनायकाला तीन, केशवाला चार; तर शिवाला अर्धी प्रदक्षिणा घालावी."

प्रदक्षिणेचे फळ आणि तिचे यमाशी असलेले नाते समजून घेणे महत्त्वाचे आहे. वराह-पुराण सांगते -

"प्रदक्षिणां ये कुर्वन्ति भक्तियुक्तेन चेतसा ।
न ते यमपुरं यान्ति, यान्ति पुण्यकृतां गतिम्" ॥

"जे भक्तियुक्त अन्तःकरणाने प्रदक्षिणा घालतात, ते यमपुरीस जात नाहीत, तर पुण्यकृत गतीस प्राप्त होतात."

मला हा श्लोक समजून घेणे अवघड जाते. यमपुरीच पुण्यकृता गती कां ठरू नये? यम हा प्रथम मृत पावलेला व म्हणून मृतांचा राजा. मरण त्याला चुकले नाही, एवढेच नाही; तर त्याचेपासून सुरू झाले. यमाची दिशा ही दक्षिण. का? पूर्वेस तोंड करून उभे राहिलो की उजवा हात दक्षिण दिशा दाखवतो. निरुक्त (१.६) सांगते 'दिक् हस्तप्रकृतिः । दक्षिणो हस्तः ।' येथे मैत्रायणी संहितेतील कथा सांगितली जाते. जेव्हा प्रजापतीने पूर्वेकडे तोंड केले, तेव्हा त्याचा उजवा हात (दक्षिण) ज्या दिशेकडे पसरला, ती दक्षिणा (South) हीच यमाची दिशा ठरली, पण सेमेटिक संस्कृतींत यमाची दक्षिण दिशा 'सुखासमाधानाची दिशा', 'आनंदप्रदेश' आहे. 'येमेन' हा प्रदेश म्हणजे अरबी देशांच्या वायव्येचा भाग. Yaman याचा लौकिक अर्थ 'दक्षिणेकडील देश, आनंदमय प्रदेश.' अरेबियाचे लॅटिन नाव Arabia Felix (Happy Arabia). सुखी 'अमन'मध्ये, 'येमन'मध्ये

असलेला अरब - प्रांत असा आहे. Yaman याचा अर्थ He faced right म्हणजेच He was happy असा आहे. सुखासाठी पावले दक्षिणेकडे वळवावीत. प्रदक्षिणा घालावी. अशाप्रकारे 'प्रदक्षिणा' या शब्दाचा धांडोळा घेता येतो.

■

**यशोदीप - ब, ज्ञानल मंगल कार्यालयाजवळ, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.**

**वसा आंतरभारतीचा**

## व्याकरण

पहिली तारीख होती,
पगार वाटण्याचं काम चालू होतं.
वेतन देणाऱ्याने रजिस्टर खोललं,
मजूर जरा घाईत होता, म्हणून तो म्हणाला,
"साहेब, माझी पगार जरा लवकर दिऊन टाका."
साहेबाने डोळे वटारले आणि म्हटले,
"इतकी काय घाई झालीय,
की लिंगच बदलून टाकलंत!
जरा व्याकरणशुद्ध बोलत जा!
माझी पगार नव्हे, माझा पगार म्हणा!
एवढंही ठाऊक नाही की पगार शब्द पुलिंगी आहे,
त्यासाठी 'माझी' नाही, 'माझा' म्हणायला हवं म्हणून?"
मजूर म्हणाला, "साहेब, म्हणायचं असलं, तर तुम्हीच म्हणा.
आपल्याच्यानं नाय व्हनार!
आसलं व्याकरण आपल्या खोपडीत जाम शिरायचं न्हाय!
शंभर रुपड्यांच्या पगाराला पुल्लिंग म्हणायला तुम्हांलाच शरम वाटायला पायजेल."

■

अनुवाद : विद्युल्लेखा अकलूजकर
मूळ कवी : सुरेश उपाध्याय
५३४६, ओपल प्लेस, रिचमंड, बी.सी., कॅनडा











एक दोन चार सहा

**आकृती १**

एक दोन चार सात नऊ

**आकृती २**

एक दोन तीन चार

पाच सहा सात नऊ

**आकृती ३**

# अरेबिक संख्याचिह्ने

**मनोहर राईलकर**

दि. १४ जानेवारी, २००२ रोजी साहित्य परिषदेत केलेल्या भाषणात, पुण्यातील बसप्रवासाबद्दल आपले अनुभव सांगताना डॉ. श्रीमती इरीना ग्लुश्कोवा, बसवर असलेल्या अनुक्रमांकांचा (मार्गक्रमांक नव्हे) उल्लेख करताना अरेबिक न्यूमरल्स म्हणाल्या. ज्यांना आपण इंग्रजी अंक म्हणतो, त्यांनाच परदेशांत काही ठिकाणी अरेबिक संख्याचिह्नं म्हणतात. आणि तेच इरीनाबाईंनी केलं. प्रा. धडफळे ह्यांच्या लेखावर प्रतिसाद देताना या संदर्भात मी थोडा खुलासा केला होता. (वर्ष २०, अंक १, पृ. ४९ वरील लेखातील मुद्दा १ पहावा.) पण त्याच मुद्द्यावर पुन्हा लिहिण्याचा योग इतक्या लवकर येईल, असं वाटलं नव्हतं.

आर्य बाहेरून कुठून भारतात आले नव्हते. इथूनच बाहेर गेले होते, हे आता निर्विवाद सिद्ध झालं आहे. हिंदू संस्कृती फार पूर्वी अफगाण-अरबस्तानात पोचली होती, याचं स्मरण करून देणं जरुरीचं वाटतं. सुप्रसिद्ध संस्कृत व्याकरणकार पाणिनी हा जन्मानं पठाण होता आणि त्याचा जन्म (इसपू ५०० वर्ष) अफगाणिस्तानात झाला होता, हेही इथं लक्षात घ्यावं. अफगाणी भाषेवर आणि संस्कृतीवर असलेल्या हिंदू संस्कृतीच्या परिणामांची अनेक उदाहरणं डॉ. प्र. वि. पाठकांच्या 'द अफगाण कनेक्शन्स्', (पारिजात प्रकाशन, पेण, १९९९) ह्यात दिली आहेत. मुजफ्फर हुसैन यांचा लेखही (दै. सामना, सोमवार दि. २५-२-२००२, पृ. ४) पहावा.

पण, संख्याचिह्नांच्या संदर्भात एखाद्या परकीय लेखकाने (शेवटी पुस्तकाचा उल्लेख केला आहे) काय म्हटलं आहे, ते पाहणंही उद्बोधक ठरेल, असं वाटतं.

अशोकाच्या काळातील संख्याचिह्नं कशी होती, ते सोबतच्या आकृती क्र. १ वरून कळून येईल. इसपू २००, म्हणजे सुमारे २२०० वर्षांपूर्वीचा नाणेघाटात सापडलेला एक शिलालेख आपल्याला आणखी मनोरंजक माहिती देतो. त्यावरची

काही संख्याचिह्नं आकृती २ मध्ये दाखवली आहेत. तद्वतच, नासिक येथील, त्याच काळातील काही कोरीव लेखांत असलेली संख्याचिह्नं आकृती ३ मध्ये दाखवली आहेत. ही पाहिली की ज्यांना आपण आज इंग्रजी संख्याचिह्नं म्हणतो किंवा इरीनाबाईसारख्या विदुषी गैरसमजानं अरेबिक संख्याचिह्नं म्हणतात ती मूळची हिंदू संख्याचिह्नंच असल्याचं लक्षात येईल. अर्थात, जाणकार पाश्चात्य लेखक आणि संशोधक त्यांना हिंदू संख्याचिह्नं असंच म्हणतात. जिन आणि कंपनीने प्रसिद्ध केलेल्या 'हिस्टरी ऑफ मॅथेमॅटिक्स्' ह्या पुस्तकात (१९२५, पृ. ६४) लेखक स्मिथ म्हणतो, .....various authors of scientific standing have attempted to show that these numerals did not originate in India, but the evidence still seems much more favourable to Hindu origin than any other that has been suggested.

अरबीत संख्याचिह्नांना Hindasi असं नाव आहे, असं स्मिथ म्हणतो, हेही इथं लक्षात घ्यावं. शून्य ह्या अर्थाचं इंग्रजीत असलेलं झीरो हे नाव अरेबिकमधील सिफ्र वरून आलं आणि अरेबिकमध्ये ते हिंदूंच्या 'शून्य' ह्या शब्दावरून आलं आहे. शून्य म्हणजे रिक्त हे आपण जाणतोच. (पाश्चात्यांना शून्य शब्दाचा हा अर्थ सांगावा लागतो.) अरबांनी स्पेनमध्ये हिंदूंच्या ह्या क्रांतिकारी (त्या काळच्या दृष्टीनं) संख्यालेखन पद्धतीचा प्रसार केला. आजही, अरबी आणि उर्दू लिप्या डावीकडून उजवीकडे लिहिल्या जात असल्या, तरी संख्यालेखन जगन्मान्य हिंदू पद्धतीनंच केलं जातं.

स्मिथ ह्यांच्या उपरोल्लेखित पुस्तकात (पृ. ७५), त्या काळात (इ.स. ९७६) स्पेनमध्ये पोहोचलेल्या हिंदू-अरेबिक संख्या कशा लिहिल्या गेल्या, ते दिलं आहे.


आकृती ४

(आकृती ४ स्मिथ ह्यांच्या पुस्तकातून साभार). तेव्हा, आज जगभर वापरली जाणारी, किंवा ज्यांना आंतरराष्ट्रीय संख्याचिह्नं असं आपण म्हणतो आणि काही परदेशी पंडित अरेबिक संख्याचिह्नं म्हणतात, ती मूळची हिंदू संख्याचिह्नंच आहेत याला यापेक्षा आणखी वेगळं प्रमाण हवं का? (इतर सर्व संदर्भ - Alfred Hooper - : Makers of Mathematics, A Modern Library Paperback, Random House, पृ. २२ ते २५. १९४८. पहिल्या आकृतीही ह्याच पुस्तकातून साभार.)

■

मृण्मयी, ५६ [illegible] नगर, पुणे ४११ ०३७.

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे राहतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी - संस्थेला | रु. १२५ फक्त | पंचवार्षिक | रु. ५५० फक्त |
| व्यक्तीला | रु. १०० फक्त | पंचवार्षिक वर्गणी | रु. ४५० फक्त |

**२. आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु.४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

**३. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

**वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-

**५. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**६. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-. शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

